नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# ८० जी प्रमाणपत्र

म. सा. परिषदेस देणगी देणाऱ्यांना आयकर खात्याकडून '८० जी प्रमाणपत्र' प्राप्त व्हावे म्हणून गेल्या दोन वर्षांपासून परिषदेचे प्रयत्न चालू होते. कळविण्यात आनंद होतो की, हे ८० जी प्रमाणपत्र परिषदेस नुकतेच प्राप्त झाले असून त्याची मूळ प्रत येथे प्रसिद्ध करीत आहोत. देणगीदारांना या प्रमाणपत्राचा निश्चितच उपयोग होईल. परिषदेच्या हितचिंतकांनी परिषदेस अर्थसाहाय्य करून कार्यकर्त्यांना प्रोत्साहित करावे, अशी विनंती आहे. इ. स. २००५-२००६ हे परिषदेचे शताब्दी वर्ष आहे. त्यासाठी विविध योजना व उपक्रम पार पाडण्यासाठी परिषदेतर्फे निधी उभारला जात आहे. सर्वांनी या निधीस सढळ हाताने मदत करावी, अशी विनंती आहे. आता पावतीच्या मागील बाजूस हे ८० जी प्रमाणपत्र मुद्रित करून घेतले जात असल्यामुळे वेगळ्या प्रमाणपत्राची गरज पडणार नाही. १०० वर्षांची वाटचाल पूर्ण करणाऱ्या या संस्थेस नवे-जुने सभासद, हितचिंतक व देणगीदार यांनी आर्थिक साहाय्य करावे, तसे आपल्या परिचितांनाही त्याबद्दल सांगावे, अशी नम्र विनंती. परिषदेस हे ८० जी प्रमाणपत्र प्राप्त होण्यासाठी मदत करणाऱ्या आयकर विभागातील संबंधित अधिकाऱ्यांची परिषद आभारी आहे.

सोबत : ८० जी प्रमाणपत्राची मूळ प्रत

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
कार्याध्यक्ष, म. सा. प.

**No. Pn/T-I/80G/R 121 /2002-2003**
131

Donations made to Maharashtra Sahitya Parishad, Tilak Road, Pune– 4110 30., will be eligible for the benefit of deduction u/s 80G of the income-tax Act, 1961, in the hands of the donors subject to the limits and condition prescribed therein.

2. The exemption granted to the above Trust is valid from 1.4.2000 to 31.03.2005 subject to adherance of following :

1. Receipts iss}d to the donors should bear the Ref. No. and date of this order.

2. The return of income accompanied by Statement of Accounts and Income & Expenditure Account, Balance sheet of the ibid Trust/Society to be submitted to the concerned Accessing Officer as per the specified d} date laid fown in the Income Tax Act.

3. If further renewal is required an application in Form No. 10 G should be made to this Office by ibid trust/Society alongwith the statements of accounts for the last 3 years alongwith the copies of acknoledgements of returns of income, and Certificate u/s 13(1) (c) of the I.T. Act, 1961, signed by the Trustees alongwith list of donors of amount of Rs. 500/- & above for the last 3 years.

Sd/-
(S.K. Jha)
Commissioner of Income Tax-I, Pune

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

❑

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक ३०५
एप्रिल-मे-जून २००३

❑

संपादक
प्रा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी

❑

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी (०२०) ४४७५९६३

---

**म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार २८ सप्टें. २००३ रोजी सायं ४.३० वाजता माधवराव पटवर्धन सभागृहात होईल, याची सभासदांनी नोंद घ्यावी.**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**मुद्रक-प्रकाशक :** रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
**मुद्रणस्थळ** : स्मिता प्रिंटर्स १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.
**अक्षरजुळणी** : एच. एम. टाइपसेटर्स, ११२०, सदाशिव पेठ, निंबाळकर तालीम चौक, पुणे ४११०३०

**सभासदांसाठी विनामूल्य**

**अंक क्र. ३०५ :** एप्रिल २००३ ते जून २००३

(महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे. या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही. अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिति नेहमीच सहमत असेलच असे नाही.)

# संपादकीय

म. सा. पत्रिकेचा हा ३०५ क्र. चा अंक **प्रा. रा. श्री. जोग** यांच्या स्मृतीस समर्पित करीत आहोत. म. सा. परिषदेचा लौकिक ज्यांच्यामुळे वृद्धिंगत झाला अशा थोर साहित्यसेवकांत प्रा. रा. श्री. जोग यांचा वाटा फार महत्त्वाचा आहे. म. सा. पत्रिकेचे संपादक, परिषदेचे कार्याध्यक्ष आणि अध्यक्ष अशा विविध महत्त्वाच्या पदांवरून त्यांनी काम केलेच; पण 'वाङ्मयेतिहासाची योजना' मार्गी लावून त्यामधील तीन खंडांचे संपादन त्यांनी नियोजनानुसार पूर्ण केले, हे त्यांचे परिषदेवरील मोठेच ऋण आहे. विशेष म्हणजे कोणतेही मानधन न स्वीकारता संस्थांचे कार्य समर्पणभावनेने कसे करावे याचा एक आदर्शच त्यांनी निर्माण केला. प्रा. जोग यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन.

दोन महिन्यांपूर्वी ख्यातनाम लेखिका **गौरी देशपांडे** आणि श्रेष्ठ गझलकार कवी **सुरेश भट** यांचे निधन झाले. त्यांचे व्यक्तिमत्त्व आणि साहित्य यांचे दर्शन घडविणारे लेख या अंकात दिले आहेत.

डॉ. सौ. विद्या प्रभुदेसाई (गोवा) यांचा गोमंतकी बोलीसंबंधीचा आणि डॉ. सौ. सारिका ठोसर (जबलपूर) यांचा हिन्दी साहित्यसृष्टीसंबंधीचा हे लेख अभ्यासकांसाठी या अंकात समाविष्ट केले आहेत. या प्रकारचे आणखी काही लेख येत्या काही अंकांतून प्रकाशित करण्यात येतील. काही पुस्तक-परीक्षणेही या अंकात समाविष्ट केली आहेत

## श्रद्धांजली

१३ एप्रिल रोजी श्री. रा. शं. दातार यांचे वृद्धापकाळाने निधन झाले. कै. दातार हे मागल्या पिढीतील प्रसिद्ध नाटककार होते. तसेच त्यांच्या कथा तेव्हाच्या 'किर्लोस्कर' मासिकातून नियमितपणे प्रकाशित होत असत.

सुप्रसिद्ध कोशकार श्री. विश्वनाथ नरवणे यांचे दीर्घ आजारानंतर ७ मे रोजी निधन झाले. भारतामधील महत्त्वाच्या अशा सर्व भाषांचे तौलनिक कोश १) भारतीय व्यवहार कोश, २) भारतीय कहावत संग्रह निर्माण करून कै. नरवणे यांनी असामान्य कर्तृत्व सिद्ध केले. भारतीय लोकजीवन आणि समाजमन समजून घेण्यासाठी हे कोश उपयुक्त आहेत. कै. नरवणे यांच्या कर्तृत्वामुळे मराठी कोशकारांच्या परंपरेत त्यांना प्रशंसनीय स्थान प्राप्त झाले.

७ मे याच दिवशी थोर भाषापंडित श्री. अमृत माधव घाटगे यांचे वृद्धापकालाने निधन झाले. ते प्राकृत भाषांचे विश्वविख्यात तज्ज्ञ होते. बोलींच्या अभ्यासाचा एक मोठा प्रकल्प

सुरू करून कोकणामधील स्थानिक बोलींसंबंधीची काही पुस्तके त्यांनी प्रकाशित केली होती. डेक्कन कॉलेज आणि भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर येथील कार्याला डॉ. घाटगे यांनी वाहून घेतले होते.

१९ मे रोजी ठाणे येथील सुप्रसिद्ध कवी **म. पां. भावे** यांचे निधन झाले. भावगीते, भक्तिगीते, लावण्या, विनोदी कविता असे विपुल लेखन कै. भावे यांनी केले. मृत्यूपूर्वी काही दिवस त्यांचे 'मी हा असा' हे आत्मकथन प्रकाशित झाले होते. कै. भावे म. सा. प. च्या कार्यकारी मंडळावर ठाणे जिल्ह्याचे प्रतिनिधी म्हणून निवडून आले होते. अ. भा. मराठी साहित्य महामंडळावर त्यांनी १९९२-९५ या काळात म. सा. प. चे प्रतिनिधित्व केले होते. प्रतिभासंपन्न कवी आणि स्नेहशील कार्यकर्ता म्हणून म. पां. भावे यांचे स्मरण नेहमीच होत राहील.

प्रा. सुरेन्द्र वडगावकर यांचे अलीकडेच वृद्धापकालामुळे निधन झाले. प्रा. वडगावकर यांचे वैशिष्ट्य म्हणजे 'कथाकली' शैलीतील ते निपुण नर्तक व नृत्यशिक्षक होते. 'किंकिणी वृंद' या नृत्यसंस्थेचे ते संचालक होते. काही चित्रपटांचे नृत्यदिग्दर्शक म्हणूनही त्यांनी काम केले. प्रा. वडगावकर जर्मन भाषेचेही जाणकार होते.

२९ मे रोजी श्रीमती माई आंबेडकर यांचे वृद्धापकालाने निधन झाले. त्यांनी डॉ. आंबेडकर यांना समर्पण भावनेने साथ दिलीच; पण डॉ. आंबेडकरांच्या निर्वाणानंतर आंबेडकरी विचारांचा प्रसार करण्याचे काम निष्ठेने केले.

३१ मे रोजी थोर संगीतकार अनिल विश्वास यांचे निधन झाले. हिन्दी चित्रपट-क्षेत्रातील युगप्रवर्तक संगीतकार हे त्यांचे स्थान अढळ असे आहे.

या सर्व दिवंगतांना म. सा. प. तर्फे आदरांजली अर्पण करीत आहोत.

## दिलगिरी व खुलासा

अंक क्र.– ३०४ मध्ये श्री. विश्वनाथ खैरे यांच्या 'मराठी गद्यातले इंग्रजीचे अवतार' या टिपणामध्ये मुद्रणाच्या असंख्य चुका राहिल्या, याबद्दल आम्ही दिलगीर आहोत. वस्तुत: सर्व चुका दुरुस्त केलेले अंतिम मुद्रित पाहूनच छापण्याचा आदेश दिला होता. पण अक्षरजुळणीकाराने चुकांनी भरलेले मुद्रितच मुद्रणासाठी वापरले, हे अंक छापून आल्यावर जाणवले. त्या वेळी काही उपाययोजना करणे शक्य नव्हते. या अक्षरजुळणीकाराच्या बाबतीत आवश्यक ती उपाययोजना केली आहे.

त्याचप्रमाणे याच पत्रिकेत पान ६७ वर नवीन देणगीदार या चौकटीत श्री प्रतापराव बेहेरे विश्वस्त यांच्या नावे रु. ७५०/- ची देणगी नजर चुकीने छापली गेली असून सदर देणगी रु. ७,५००/- आहे.

**संपादक**

# औचित्यमार्गी विवेकी समीक्षक : प्रा. रा. श्री. जोग

(जन्म : १५-५-१९०३ निधन : २१-२-१९७७)

डॉ. गं. ना. जोगळेकर

प्रा. रा. श्री. जोग यांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष. त्यांच्या निधनालाही सव्वीस वर्षे होऊन गेली. आजच्या पिढीने त्यांना पाहिले असण्याची शक्यता फारच कमी आहे. त्यांच्या सहवासात आलेली, अध्यापनाचा लाभ झालेली, त्यांच्या एखाद्या कार्यात सहभागी झालेली माणसे तर अगदीच मोजकी आहेत. कुणाही मोठ्या लेखकाच्या बाबतीत असे नेहमीच अनुभवाला येत असते. ललित लेखकाला काळाकडून थोडे झुकते माप मिळते. काही साहित्यकृतींचा अनेकदा उल्लेख होत राहतो. त्यामुळे सर्वसामान्य वाचकाला असे लेखक माहीत असतात. समीक्षकाचे स्मरण मात्र फार थोड्यांना होते. काळावर मात करून टिकून राहणारी नावे शेवटी अत्यल्पच असतात.

प्रा. रा. श्री. जोगांसारखे लेखक वेगळ्याच मनोवृत्तीचे असतात. आपल्या वाट्याला जे काही आले त्याची पूर्तता आपण आपल्या कुवतीनुसार आणि प्रामाणिकपणाने केली असे म्हणता यावे एवढीच त्यांची अपेक्षा असते. जोग ज्या काळात वावरले त्या वेळच्या परिस्थितीनुसार जे काही करणे आवश्यक होते, ते त्यांनी कर्तव्यबुद्धीने पार पाडले यांत शंका नाही. १९६४ मध्ये त्यांच्या एकसष्टीचा समारंभ झाला. त्या वेळी झालेल्या सत्काराला उत्तर देताना प्रा. जोग म्हणाले होते : "खरे म्हणजे सत्कार करावा असे कोणतेही महत्कृत्य माझ्या हातून घडलेले नाही. मी आयुष्यात जे काही केले ते केवळ कर्तव्य होते. आता आजकाल कर्तव्य करणे हीच गोष्ट सत्कार करण्यासारखी वाटत असावी." न केल्याचेही श्रेय आपलेच आहे, असे ओरडून सांगायच्या आजच्या काळात प्रा. जोगांचा विनम्रपणा केवळ अद्‌भुत कोटीतला ठरतो!

### जोग पितापुत्र

प्रा. रा. श्री. जोग तसे मध्यमवर्गाचेच प्रतिनिधी, पण त्या काळात अनेकांच्या वाट्याला गरिबीचे आणि कष्टाचे जिणे येत असे, तसे काही जोगांचे झाले नाही. त्यांचे वडील 'श्रीपाद बाजी जोग' हे पुणे नगरपालिकेत उपमुख्याधिकारी या पदावर होते. (खरे म्हणजे ते मुख्याधिकारीच व्हायचे; पण त्या काळात अभियांत्रिकी पदवीधराची त्या पदावर नेमणूक होत

असे. पुणे शहराच्या सुधारणेबाबत गाजलेले कै. भागवत तेव्हाचे मुख्य अधिकारी होते.) मुख्य अधिकारी नसले तरी श्रीपाद बाजी यांचा घरीदारी सगळीकडे दरारा होता. अधिकारपणा त्यांच्या स्वभावात भरून राहिला होता. त्यात ते वृत्तीने सनातनी, अगदी कर्मठ म्हणावेत असे. यामुळे असेल, पण पिता-पुत्रांत एक आंतरिक दुरावा होता. प्रा. जोग आपल्या वडिलांचा मान राखत, पण आपल्या नास्तिक वृत्तीला पटेल तेच करीत. आपल्या मुलाच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा श्रीपाद बाजी जोग यांना अभिमान वाटत असला तरी त्याच्या नास्तिक वृत्तीमुळे दोघांमध्ये कायमचा अबोल संघर्ष असे. प्रा. जोगांना जवळपास साठीपर्यंत पित्याचे छत्र लाभल्यामुळे स्वत: पुढाकार घेऊन कसल्या अडचणींना त्यांना तोंड द्यावे लागले नाही. संस्कृत आणि इंग्रजी भाषांचे सूक्ष्म अध्ययन आणि कामातली शिस्त हा वारसा प्रा. जोगांना वडिलांपासून मिळाला. श्रीपाद बाजी यांचा ग्रंथसंग्रह मोठा होताच; प्रा. जोगांनी तो अनेक पटीने वाढविला. लहानपणापासून अभ्यासाला आणि वाचनाला भरपूर उत्तेजन मिळाल्याचे चीज प्रा. जोगांनी केले. विद्याव्यासंग आणि ज्ञानदान यातच ते आयुष्यभर रमले.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात शिक्षित मध्यमवर्गापुढे जगण्यासाठी ठरावीक मार्ग उपलब्ध असत. सामान्यत: सुस्थितीत असलेले तरुण विद्यार्थी वकील, डॉक्टर, इंजिनिअर अशा व्यावसायिक अभ्यासक्रमांकडे वळत. बाकी बहुसंख्य तरुण सरकारी नोकरीच्या मागे लागत. सरकारी नोकरी म्हणजे स्थैर्याची परिसीमाच. कारण निवृत्त झाल्यावरही पेन्शन मिळण्याची खात्री असे. काही जण दुसरे काही जमत नाही म्हणून शिक्षक होत, तर दुसरे काही ध्येयवादाच्या पोटी शिक्षणक्षेत्र निवडीत. शिक्षणाचा प्रसार फारसा झाला नसला तरी जिल्हा आणि तालुका स्तरांपर्यंत माध्यमिक शाळा नावारूपाला आल्या होत्या. प्रत्येक शाळेत नवीन पिढी घडवू पाहणारे सेवाव्रती शिक्षक असत. त्यांना समाजात मान असे. बहुतेक शिक्षक केवळ पदवीधर असत. बी. टी. सारखा अभ्यासक्रम पूर्ण केलाच पाहिजे, असे बंधन नव्हते. तरीही अनेक शाळांमध्ये शैक्षणिक प्रयोग होत असत. परीक्षेमध्ये जीवघेणी स्पर्धा नव्हती. गुणांची टक्केवारी स्वस्त आणि सुलभ झाली नव्हती. प्रथम श्रेणीचे यश हे दुर्मिळ मानले जात असे. अनेक विद्यार्थ्यांचे शिक्षण मॅट्रिकबरोबर संपत असे. बहुतेकांचे जीवन धोपटमार्गी असे. आर्थिक सुबत्ता क्वचितच कुणाच्या वाट्याला येई. मात्र कायद्याचे पालन करावे, आपले कर्तव्य चोखपणे पार पाडावे असे संस्कार शालेय जीवनात होत असत.

रा. श्री. जोगांचे महाविद्यालयीन शिक्षण 'फर्ग्युसन'मध्ये झाले. त्या काळात पुण्यात डेक्कन आणि फर्ग्युसन ही दोनच महाविद्यालये होती. (तिसरे पूना कॉलेज सुरू झाले होते; पण त्याचे 'स. प. महाविद्यालय' हे रूपांतर अजून व्हायचे होते.)

डेक्कन कॉलेजमधून एके काळी ध्येयवादी तरुणांची परंपरा निर्माण झाली, पण आता मात्र ते सधन वर्गाचे, जमीनदारांचे कॉलेज म्हणन ओळखले जात होते. शिवाय ते गावापासून दूर होते. फर्ग्युसनला स्थापनेपासूनच एक रोमहर्षक इतिहास होता. टिळक-आगरकर, गोखले-कर्वे यांचा काळ मागे पडला असला तरी रँग्लर र. पु. परांजपे आणि इतर विद्वान



अनुक्रमणिका

प्राध्यापक यांमुळे संपूर्ण भारतात फर्ग्युसनचे नाव गाजत होते. त्या काळात इंग्रजी आणि संस्कृत भाषांचे अभ्यासक्रमात वर्चस्व होते. बहुतेक विद्यार्थी हेच विषय घेऊन बी. ए. होत. या दोन्ही विषयांत रा. श्री. जोगांची गती विशेष होती. (इंटरच्या परीक्षेत मुंबई विद्यापीठात इंग्रजी विषयात ते पहिले आले होते, त्यामुळे त्यांना विद्यापीठाची पारितोषिकेही मिळाली होती.) संस्कृत विषय पदवीसाठी घ्यायला वडिलांचे प्रोत्साहन होतेच. जोगांना भाषा विषयाची मुळातच आवड होती. संस्कृत, इंग्रजी या विषयांबरोबर त्यांनी मराठी हा विषयही मुद्दाम निवडला. १९१७ नंतर मुंबई विद्यापीठात मराठी-गुजरातीसारख्या देशी भाषांचा अभ्यासक्रमात प्रवेश झाला. (मात्र त्यासाठी न्या. रानडे, रा. भि. गुंजीकर अशा अनेकांना झगडावे लागले होते.) १९१४ मध्ये विद्यापीठाने भाषाविषयक धोरण बदलले तेव्हा मराठीचा अभ्यासक्रम तयार करण्याची जबाबदारी हरी नारायण आपटे यांच्यावर सोपवली. (स्वत: पदवीधर नसलेल्या हरिभाऊंनी विचारपूर्वक हा अभ्यासक्रम तयार केला. 'केशवसुतांची कविता' त्यांनी अभ्यासक्रमात समाविष्ट केली. इतकेच नव्हे, तर केशवसुतांची कविता संग्रहरूपाने १९१७ मध्ये त्यांनीच प्रथमत: प्रकाशित केली. कवी म्हणून केशवसुतांच्या अभ्यासाला तेव्हापासून विशेष चालना मिळाली. आपल्या मित्राचे ऋण हरिभाऊंनी याप्रकारे फेडले यांत शंका नाही.)

**जोगांचे गुरू : प्रा. वा. ब. पटवर्धन**

अभ्यासक्रमात नव्याने आलेला मराठी हा विषय निवडल्यामुळे रा. श्री. जोग प्रा. वासुदेव बळवंत पटवर्धन यांच्या विशेष संपर्कात आले. प्रा. वा. ब. पटवर्धन हे फर्ग्युसनमधले नाणावलेले इंग्रजीचे प्राध्यापक. शेक्सपिअरची नाटके शिकवण्याबद्दल ते प्रसिद्ध होते. इंग्रजीवरील प्रभुत्व, नाट्याची जाण, खणखणीत वक्तृत्व यांमुळे त्यांचे तास फार रंगत असत. प्रा. पटवर्धन काव्याचेही प्रेमी आणि मराठीचे अभिमानी होते. (ते मूळचे नागपूरचे आणि कवी केशवसुत काही काळ तेथे होते तेव्हापासून दोघांची मैत्री होती. केशवसुतांनी पटवर्धनांना उद्देशून एक पत्ररूप कविताही लिहिली आहे. 'काव्य आणि काव्योदय', 'विल्सन भाषा-शास्त्रीय व्याख्याने' ही त्यांची मराठी साहित्यातली महत्त्वाची भर होय.)

मराठी हा विषय अभ्यासक्रमात आला खरा, पण तो शिकवायचा कुणी हा प्रश्न होता. ज्यांना इंग्रजी किंवा संस्कृत शिकविण्याचा अनुभव आहे आणि ज्यांना मराठीचीही आवड आहे, अशा प्राध्यापकांकडे हे काम आले. डेक्कन कॉलेजमध्ये प्रा. श्री. नि. चापेकर, स. प. महाविद्यालयात प्रा. दत्तो वामन पोतदार (हे इतिहासाचे पदवीधर), मुंबईत प्रा. माधव दा. अळतेकर (हे इंग्रजीचे), न. र. फाटक (इतिहास) हे सगळे मराठी शिकविणारे सुरुवातीचे प्राध्यापक. प्रा. वा. ब. पटवर्धनांशी वेळोवेळी चर्चा करण्याची संधी रा. श्री. जोगांना मिळाली. स्वतंत्र अभ्यासामुळे प्रा. पटवर्धनांची काही वेगळी मते बनली होती. या मतांचा रा. श्री. जोगांवर कळत नकळत परिणाम झाला. नामदेव किंवा तुकाराम हे भावकवी म्हणून प्रा. पटवर्धनांना आवडत; पण अनेक अभंगांतून त्याच त्या तक्रारी, तेच ते आत्मनिवेदन, तेच ते उपदेश हे सगळे प्रा. पटवर्धनांना कंटाळवाणे वाटे. ही सततची पुनरुक्ती काव्याची हानी

करणारी ठरते, असे प्रा. पटवर्धनांचे मत बनले होते. प्रा. रा. श्री. जोगांनी बरेच नंतर १९५९ मध्ये 'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन' या पुस्तकात अभिरुचीच्या दृष्टीने मराठी साहित्याची जी पाहणी केली, त्यात संतकाव्याबद्दल लिहिताना प्रा. पटवर्धनांची मते उद्धृत करून ती योग्य असल्याचे सूचित केले आहे.

१९२६ मध्ये नाशिकच्या हं. प्रा. ठाकरसी महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक म्हणून प्रा. जोगांची नेमणूक झाली. (काही काळ त्यांनी संस्कृतचेही अध्यापन केले.) त्या काळात महाराष्ट्रात महाविद्यालये अगदी मोजकी होती. मुंबई, पुणे, कोल्हापूर, सांगली इथली महाविद्यालये प्रसिद्ध होती. अमळनेर आणि नाशिकमध्ये ती नुकतीच सुरू झाली होती. विदर्भातही नागपूर आणि अमरावती येथेच काय ती महाविद्यालये होती. संपूर्ण मराठवाड्यात एकही महाविद्यालय नव्हते. त्यामुळे मराठी हा विषय घेऊन ज्यांनी एम. ए. ही पदवी संपादन केली आहे, अशा अनेकांना त्या काळात मिळेल त्या शाळेत अध्यापन करावे लागले. श्री. म. माटे, पु. ग. सहस्रबुद्धे यांच्यापासून वा. ल. कुलकर्णी यांच्यापर्यंत अशी अनेक नावे आहेत. नंतरच्या काळातही गो. म. कुलकर्णी, म. ना. अदवन्त, स. रा. गाडगीळ अशा अनेकांनाही कमी-अधिक काळ शाळेत नोकरी करावी लागली. या स्थितीत प्रा. जोग असे भाग्यवान ठरतात की, त्यांना एकदम महाविद्यालयात शिकविण्याची संधी मिळाली. त्या काळात शिक्षकवर्गाची आर्थिक स्थिती फारच वाईट होती. तुलनेने प्राध्यापकांना बरी वेतनश्रेणी होती आणि स्वास्थ्यही अधिक होते. प्रा. जोगांनी मिळालेल्या संधीचे सोने केले यात शंका नाही.

**प्राध्यापकी जीवन**

रा. श्री. जोगांच्या प्राध्यापकी जीवनाचे तीन टप्पे दिसतात. १९२६ ते ३२ अशी पहिली सहा वर्षे ते नाशिकला नव्याने सुरू झालेल्या हं. प्रा. ठाकरसी महाविद्यालयात होते. तेथे ते संस्कृत आणि मराठी असे दोन्ही विषय शिकवीत. त्यांच्या या प्रारंभकाळात वा. ल. कुलकर्णी, कुसुमाग्रज, माधव मनोहर असे काही बुद्धिमान विद्यार्थी त्यांच्या वर्गात होते. हे सर्वजण कालांतराने नामवंत लेखक झाले,पण 'आम्ही जोगांचे विद्यार्थी आहोत' असे ते अभिमानाने म्हणत. १९३२ मध्ये एक वर्षभर जोग फर्ग्युसनमध्ये होते आणि १९३३ पासून ४० पर्यंतच्या काळात विलिंग्डन महाविद्यालय सांगली येथे त्यांनी अध्यापन केले. (येथे त्यांनी आवश्यकतेनुसार इंग्रजीही शिकविले.) १९४० ला ते पुन्हा फर्ग्युसनमध्ये बदली होऊन आले आणि १९६३ मध्ये तेथूनच ते सेवानिवृत्त झाले. सलग ३७ वर्षे महाविद्यालयीन स्तरावर मराठीचे अध्यापन करणारे त्या काळात क्वचितच कोणी असतील. वाङ्मयाचा अभ्यासक या नात्याने त्यांनी या तिन्ही टप्प्यांत महत्त्वाचे लेखन केले आहे. 'अभिनव काव्यप्रकाश' हे त्यांचे पुस्तक नाशिकच्या वास्तव्यात लिहिले गेले. 'संस्कृत काव्यवाङ्मया'चे लेखनही त्याच काळात झाले होते; प्रकाशन मात्र उशिरा झाले. सांगलीच्या वास्तव्यात त्यांनी 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' या गाजलेल्या ग्रंथाचे लेखन केले. पुण्याला



अनुक्रमणिका

आल्यानंतर काव्यसमीक्षेची गाजलेली सर्व पुस्तके, अनेक महत्त्वाची संपादने आणि वाङ्मयेतिहासाचे खंड हे सर्व साहित्य प्रकाशित झाले. प्राध्यापकाचा व्यवसाय आणि साहित्यनिर्मिती यांची समांतर अशी वाटचाल त्यांनी केली आणि ही वाटचाल त्यांना आणि इतरांना फलदायी अशी झाली.

**कवी 'निशिगंध'**

फर्ग्युसनमध्ये विद्यार्थी असल्यापासून जोगांचे काव्यलेखन अधूनमधून चालू असे. त्यांच्या काही कविता त्या काळात कॉलेजच्या नियतकालिकातही प्रकाशित झाल्या आहेत. 'निशिगंध' हे टोपणनाव त्यांनी काव्यलेखनासाठी घेतले होते. त्यांनी स्वत:च 'ज्योत्स्नागीत' व 'निशागीत' असे दोन संग्रह प्रकाशित केले होते. त्यांच्या कवितांमध्ये त्या काळात गाजत असलेल्या रविकिरण मंडळाच्या काव्याचे पडसाद उमटलेले दिसतात. मराठीत फारशा प्रचारात नसलेल्या 'दोहा' या अर्धसम मात्रावृत्तात त्यांच्या बहुतेक कविता आहेत. (या वृत्ताचे 'छंदोरचने'मधील 'दयिता' हे नाव जास्तच अपरिचित वाटते.) कवीच्या सौम्य, प्रांजळ स्वभावाचे प्रतिबिंब त्याच्या कवितांत उमटलेले असले तरी त्यांतले कवित्व फारसे आकर्षक नाही. त्यातल्या रचनेच्या सफाईमुळे माधव जूलियनांना जोगांच्या कविता आवडत व तसे ते बोलूनही दाखवत. कवितालेखनाचा जोगांचा उत्साह हळूहळू कमी होत गेला आणि कालांतराने 'निशिगंध' हेही रविकिरणांच्या छायेतले कवी होते, इतकेच वर्तमान उरले.

प्रा. जोगांनी कवितालेखनाचा मार्ग सोडला तरी काव्यचिकित्सेची आणि काव्येतिहासाची वाट त्यांनी जाणीवपूर्वक स्वीकारली होती. 'अर्वाचीन मराठी काव्य' या पुस्तकात निशिगंधाच्या कवितेचे मूल्यमापनही त्यांनी एका परिच्छेदात केले आहे. प्रा. जोग म्हणतात-- "(निशिगंधाच्या कवितेत) कलेचा भाग विशेष नसल्याने साहजिकच त्यांना अधिक लोकप्रियता आणि चिरस्थायिता मिळू शकली नाही. आज काव्येतिहासामध्ये उल्लेख करण्यापलीकडे त्यांना महत्त्व उरलेले नाही," स्वत:च्या कवितेवर स्वत:च इतक्या तटस्थपणाने भाष्य केल्यावर दुसऱ्यांनी काही म्हणायचे शिल्लक राहात नाही. 'अर्वाचीन मराठी काव्य' या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीत तर त्यांनी 'निशिगंधा'बद्दलचा परिच्छेदच वगळून टाकला!

[प्रा. जोगांचेच समकालीन प्रा. भवानीशंकर श्री. पंडित हेही कवी आणि काव्यसमीक्षक. त्यांनी 'आधुनिक मराठी कविता' या ग्रंथात स्वत:च्या कवितेबद्दल स्वत: लिहिले नाही; पण तेवढा भाग डॉ. वि. भि. कोलते यांच्याकडून लिहून घेतला आहे. डॉ. कोलते यांनी अर्थातच प्रा. पंडित यांच्या काव्यगुणांची प्रशंसा केली आहे! प्रा. पंडितांची कविता निशिगंधांच्या कवितेपेक्षा सरस आहे यात शंका नाही.] आपल्या कवित्वाच्या मर्यादांची जाणीव प्रा. जोगांना असली तरी ते कवितेला पूर्णपणे विसरले मात्र नाहीत. उलट त्यांनी आयुष्याच्या शेवटी 'साराच वेडेपणा' हा संग्रह प्रकाशित करून त्याचे खासगी स्वरूपात वितरण केले. या संग्रहात त्यांनी आपल्या निवडक कविता एकत्र केल्या आहेत. हा संग्रह नव्या-जुन्या स्नेह्यांना भेट देताना 'आपल्याकडून परीक्षणाची अपेक्षा नाही,' हे त्यांनी आवर्जून सांगितले

आहे. काळाच्या ओघात जोगांची कविता मागे पडली तरी 'अजुनि आठवे मजला ती स्पष्टपणे वेळ; करित काव्यगायन पहिले होत अखेरील' ही स्वत:ची थट्टा करणारी खेळकर कविता रसिकांना आठवत राहील.

प्रा. जोगांनी काव्यलेखनाचा मार्ग सोडला तरी काव्यप्रेम सतत जोपासले. त्यामुळेच तर त्यांच्या समीक्षालेखनातील मुख्य भाग काव्यचर्चेने व्यापला आहे. अभिनव काव्यप्रकाश, काव्यविभ्रम यांच्या रूपाने त्यांनी काव्याचे शास्त्र स्पष्ट केले; नव्या-जुन्या अनेकांच्या कवितांचे संपादन करून चांगल्या कवितेचे सौंदर्य उलगडून दाखविले, तर अर्वाचीन मराठी काव्याचा शंभरहून अधिक वर्षांचा इतिहास जाणकारीने आणि साक्षेपाने कथन केला.

१९३० हे वर्ष मराठी समीक्षेला नवे परिमाण देणारे ठरले. मुंबई विद्यापीठात मराठीचा समावेश तोपर्यंत एम.ए. परीक्षेपुरता होता. आता मराठीचा समावेश बी.ए. परीक्षेसाठीचा मुख्य विषय म्हणून करण्यात आला. संस्कृत आणि इंग्रजी विषयांच्या अभ्यासक्रमाला समांतर अशा प्रश्नपत्रिका नेमण्यात आल्या. भारतीय काव्यशास्त्र, पाश्चात्त्य टीकाशास्त्र, वाङ्मयाचा इतिहास, भाषाशास्त्र, प्राचीन व अर्वाचीन काळातील साहित्यकृतींचा पाठ्यपुस्तक म्हणून अभ्यास, वाङ्मयप्रकारांचा अभ्यास, लेखकाचा विशेष अभ्यास असे पूर्वी नसलेले विषय अभ्यासक्रमात आले. त्यामुळे मराठी साहित्याची सर्वांगीण चर्चा व्हायला ही अभ्यासक्रमाची पुनर्रचना उपकारक ठरली, हे निश्चित. 'अभिनव काव्यप्रकाश' (जोग), 'काव्यालोचन' (द. के. केळकर), 'सारस्वतसमीक्षा' (य. र. आगाशे), 'प्रतिभासाधन' (ना. सी. फडके), 'मराठी भाषा : उद्गम आणि विकास' (कृ. पां. कुलकर्णी), बडोद्याचे ग. रं. दंडवते किंवा इंदूरचे वि. सी. सरवटे यांची वाङ्मयेतिहासाची पुस्तके, 'प्रदक्षिणा' हा लेखसंग्रह, मा. का. देशपांडे यांनी फडके, खांडेकर, अत्रे यांच्यावर लिहिलेली पुस्तके, द. वा. पोतदारांचा 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार', गं. बा. सरदार यांचे 'अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका' अशी तऱ्हेतऱ्हेची अनेक पुस्तके मराठीत प्रथमच अभ्यासकांपुढे आली. नंतरच्या काळातही या प्रकारची, अभ्यासक्रमाला धरून असलेली अनेक पुस्तके प्रकाशित होत राहिली. काव्य, कथा, निबंध या वाङ्मयप्रकारांची संपादित पुस्तके तर पुष्कळच प्रसिद्ध झाली. विशिष्ट वाङ्मयप्रकारापुरते लिहिणारे-बोलणारे असे अनेक अभ्यासक निर्माण झाले. एकंदरीत साहित्यचर्चेत विशेषीकरण निर्माण झाले. अभ्यासक्रमाची विद्यापीठाने पुनर्रचना केली, त्याचेच हे फलित म्हणता येईल.

### अभिनव काव्यप्रकाश

प्रा. जोगांनी 'अभिनव काव्यप्रकाश' हे पुस्तक लिहिले ते नव्या अभ्यासक्रमाच्या गरजेपोटी. विद्यार्थिजीवनात महत्त्वाचे संस्कृतग्रंथ मुळातून अभ्यासले असल्याने त्यांना साहित्यशास्त्रासंबंधी लिहिण्यात कसली अडचण नव्हती. बहुसंख्य विद्यार्थ्यांना संस्कृत अभ्यासाची बैठक नसते हे ओळखून, त्यांनी अशा विद्यार्थ्यांचा वर्ग डोळ्यापुढे ठेवून, काव्यशास्त्राचा बाऊ निर्माण न करता जिज्ञासूंची गरज भागेल अशी या ग्रंथाची रचना केली आहे.

काव्यलक्षण, काव्यप्रयोजन, काव्यकारण (प्रतिभाव्यापार), शब्दशक्ती या क्रमाने काव्यचर्चेत रसविचाराला महत्त्वाचे स्थान प्राप्त होते आणि त्या अनुषंगाने काव्यानंदमीमांसा झाल्यावरच ती पूर्णत्वास येते, हे सर्व टप्पे प्रा. जोगांनी यथाक्रम दाखविले आहेत. मात्र अनेक ग्रंथकार ध्वनिविचाराचे स्वतंत्र प्रकरण करतात तसे न करता 'व्यंजना' या शब्दशक्तीच्या चर्चेतच त्यांनी ध्वनितत्त्वाचे विवेचन केले आहे. संस्कृत साहित्यशास्त्रज्ञ त्यांना प्रिय आणि मान्य असलेल्या काव्यतत्त्वालाच प्राधान्य देऊन आपल्या ग्रंथाची रचना करतात. त्यामुळे त्यांचे विवेचन प्रभावी झाले तरी ते एकांगी होऊ शकते. प्रा. जोगांना हे रुचण्यासारखे नव्हते. त्यामुळे त्यांनी सर्व विवेचन अलिप्तपणाने करण्यावर भर दिला आहे. काव्यविचारात प्रधान काय आणि गौण काय याचे भान त्यांनी राखले आहे. रीती आणि गुण, अलंकार, काव्यगुण, काव्यदोष, काव्यप्रकार, पद्यप्रकार हे विषय पूरक आहेत असे मानून त्यांची माहिती होण्यापुरते विवेचन त्यांनी केले आहे. काव्यचर्चेत काव्यानंदाबद्दल अतिशयोक्तीपूर्ण वर्णन करण्याची पद्धत आहे. काव्यानंद अलौकिक असतो, 'ब्रह्मास्वाद–सहोदर' असे त्याचे रूप असते, हे रूढ संकेत प्रा. जोगांना मान्य नसावेत. कारण काव्यानंद हा 'सुखदुःखमिश्रित' असतो हे मत त्यांनी स्वीकारले आहे असे दिसते. विशेष म्हणजे भामह, अभिनवगुप्त, आनंदवर्धन आणि विश्वनाथ या प्रमुख आचार्यांनी 'सुखदुःखमिश्रित' ही भूमिका स्वीकारलेली नाही, तर 'रामचंद्र-गुणचंद्र' या तुलनेने कमी प्रसिद्ध आचार्यांचे म्हणणे प्रा. जोगांना स्वीकारावेसे वाटते. कारण तसे केले नाही, तर करुणरस मीमांसा करण्यात अडचण येते. या सगळ्याचा अर्थ असा की विद्यार्थ्यांना संस्कृत आचार्यांचे म्हणणे काय आहे ते तर सांगायचे, पण कुणातरी एकाला सरधोपटपणे अनुसरायचे असा प्रकार प्रा. जोगांनी टाळला आहे. 'अनाग्रहीपणा' हे प्रा. जोगांचे वैशिष्ट्य त्यांच्या या पहिल्या ग्रंथापासून दिसते.

'अभिनव काव्यप्रकाश' प्रकाशित झाले त्याच वर्षी प्रा. द. के. केळकरांचे 'काव्यालोचन'ही अभ्यासकांपुढे आले. वस्तुतः प्रा. केळकर हे शैलीदार लेखक. त्यांच्या लेखनात एक प्रकारचा अनौपचारिक गोष्टीवेल्हाळपणा आहे. वाचकांशी गप्पा माराव्यात तसा त्यांच्या लिहिण्या-बोलण्याचा ढंग असतो. संस्कृत आचार्य वर्गीकरणाच्या मागे लागून विषय किचकट करतात अशा प्रकारची टीका प्रा. केळकर करत राहतात. त्यांचे विवेचन रंजक होते; पण अभ्यासकांना याचा फारसा उपयोग नसतो. नेमका विषय योग्य त्या प्रमाणात मांडण्याच्या पद्धतीमुळे प्रा. जोगांचे पुस्तक अभ्यासकाला उपयुक्त वाटते. 'अभिनव काव्यप्रकाश'च्या एकामागोमाग अनेक आवृत्त्या का निघाल्या याचे उत्तर यातून मिळते. साधारण १९६० पर्यंत प्रा. जोगांचे पुस्तक आघाडीवर होते, यात शंका नाही. खरे म्हणजे, य. र. आगाशे, रा. शं. वाळिंबे, स. रा. गाडगीळ यांची पुस्तकेही वैशिष्ट्यपूर्ण अशीच होती; पण 'अभिनव काव्यप्रकाश'ची जागा दुसरे कोणते पुस्तक घेऊ शकले नाही, हे मात्र खरे. प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांचे 'भारतीय साहित्यशास्त्र' हे पुस्तक प्रकाशित झाल्यावर मात्र सर्व चित्र पालटले. भामह-दंडी पासून अभिनवगुप्तापर्यंत विविध आचार्यांनी काव्याचे जे जे आत्मतत्त्व मानले

त्यात कसा एक क्रम आहे याची संगती प्रा. देशपांडे यांनी स्पष्ट केली आणि एक पुढचा टप्पा गाठला. प्रा. देशपांडे यांचे पुस्तक प्रगत स्वरूपाचे आहे, हे प्रा. जोग यांना मान्यच होते.

१९६० किंवा १९७० पर्यंत मराठीतील काव्याचे स्वरूप इतके बदलून गेले होते की, परंपरागत काव्यशास्त्राचा त्याच्याशी मेळ बसत नव्हता. काव्याच्या समीक्षेत कालानुरूप नवे प्रश्न निर्माण होत होते आणि प्रा. जोग आपल्या परीने हे प्रश्न सोडवत होते. काव्यप्रयोजनापासून रसचर्चेपर्यंत सगळेच काही बदलत चालले आहे ही जाणीव 'अभिनव काव्यप्रकाश'च्या प्रत्येक नव्या आवृत्तीत प्रा. जोग प्रकट करत होते. काव्यगुण, काव्यदोष, अलंकार या गोष्टींना आता मर्यादितच अर्थ आहे, हे त्यांना मान्य होते. प्रा. गंगाधर गाडगीळांसारखे नवकाव्याचे आग्रही समर्थक तर "रसचर्चेची अडगळ कशाला?" असा रोखठोक सवाल करत होते. त्याला उत्तर होते; पण ते फारसे समाधान करणारे नव्हते. जोग किंवा इतर समीक्षक यांची काव्यशास्त्राची पुस्तके आता इतिहासजमा झाली असेच नव्या पिढीच्या कवींना आणि काव्यमीमांसकांना वाटू लागले होते, पण अजून विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात परंपरागत काव्यशास्त्र टिकून होते. त्यामुळे या पुस्तकांचा अभ्यास होत होता. दुसरीकडे काही विद्वान 'प्रक्षोभ', 'क्रान्ती' असे नवनवीन रस सुचवीत होते, तेव्हा गोंधळात भरच पडत होती. एकंदरीने 'अभिनव काव्यप्रकाश'ने काव्यक्षेत्रातली पुष्कळ स्थित्यंतरे अनुभवली असे म्हटले पाहिजे.

### सौंदर्यशोध आणि आनंदबोध

'अभिनव काव्यप्रकाश' ग्रंथाने मराठीत संस्कृत काव्यशास्त्राच्या पायाभरणीचे काम केले असले तरी प्रा. जोग तेवढ्यावरच थांबले नाहीत. एकोणिसाव्या शतकापासून आपल्या शिक्षितवर्गापुढे प्रामुख्याने इंग्रजी (पाश्चात्य) वाङ्मय आहे. पाश्चात्त्यांचे साहित्यशास्त्र बऱ्याच प्रमाणात वेगळे आहे. संगीत, नृत्य, चित्र, शिल्प आदी सर्व ललितकला, त्यांमधील निर्मितीचे समान तत्त्व, त्यातून घडणारा सौंदर्याचा आविष्कार आणि सौंदर्याच्या अनुभूतीने मिळणाऱ्या आनंदाचे स्वरूप यावर पाश्चात्त्य साहित्यचर्चा आधारलेली असते. केवळ भारतीय साहित्यशास्त्र पुरेसे नाही; त्याला पाश्चात्त्य टीकाशास्त्राची जोड दिली पाहिजे असे प्रा. जोगांना वाटत होते. त्यातूनच त्यांचा 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' हा ग्रंथ सिद्ध झाला. विशेष म्हणजे कुठल्याही विद्यापीठीय गरजेतून हे लेखन झालेले नाही. स्वत:च्या स्वतंत्र अभ्यासातून ते आकाराला आले आहे. खरे म्हणजे, आधीच्या पुस्तकात केवळ संस्कृत काव्यशास्त्र मराठीत समजावून सांगण्याचा हेतू आहे. 'सौंदर्यशोध...' हे आत्मिक प्रेरणेतून निर्माण झालेले पुस्तक आहे. जोगांचा कलाविचार, त्यांचे स्वतंत्र चिंतन आणि त्यातून त्यांना काढावेसे वाटलेले निष्कर्ष यांचे एकत्रित दर्शन याच ग्रंथात होते. सौंदर्य वस्तुकेंद्री असून ते अनेकांगी आहे, तर आनंद व्यक्तिकेंद्री असून तो संमिश्र प्रकारचा असतो, हे मुख्य सूत्र या ग्रंथात प्रा. जोगांनी मांडले आहे. बा. सी. मर्ढेकर यांनी 'सौंदर्य आणि साहित्य' हे पुस्तक लिहून मराठीत सौंदर्यशास्त्र प्रथम आणले असे मानले जाते. वस्तुत: मर्ढेकरांआधी दहा वर्षे



अनुक्रमणिका

प्रा. जोगांनी या शास्त्राच्या अभ्यासाला चालना दिली होती यात शंका नाही. मर्ढेकरांनंतर पु. शि. रेगे, रा. भा. पाटणकर , प्रभाकर पाध्ये यांनी आणि नंतर अनेकांनी या चर्चेत भर घातली. परस्परविरोधी टोकाची मते मांडली गेली, असेही दिसते. पण प्रत्येकाने प्रा. जोगांच्या मतांची दखल घेतली आहे हे विशेष. रा. भा. पाटणकर आणि प्रभाकर पाध्ये यांनी पुष्कळ ठिकाणी तीव्र मतभेद व्यक्त केला असला तरी दोघांनीही प्रा. जोगांचे कार्य पायाभूतच मानले आहे. मराठीतील साहित्य-विचाराला प्रौढ आणि प्रगत दिशा देणाऱ्यांत प्रा. जोगांचा समावेश 'सौंदर्यशोध...' मुळे नि:संशय होतो.

## काव्यविभ्रम

काव्यचर्चेला अनुलक्षून प्रा. जोगांनी 'काव्यविभ्रम' हे स्वतंत्र पुस्तक लिहिले. त्यांनीच म्हटल्याप्रमाणे 'अभिनव काव्यप्रकाश'ला पूरक असे हे पुस्तक आहे. शालेय अभ्यासक्रमात पूर्वीपासून 'वृत्ते आणि अलंकार' हा एक विषय असतो. या विषयाची प्राथमिक माहिती देणारी अनेक पुस्तके आहेत. पण प्रौढ वाचकवर्ग डोळ्यांसमोर ठेवून प्रा. जोगांनी या 'काव्यविभ्रम'ची रचना केली आहे. 'विभ्रम' हा शब्द त्यांनी हेतुत: योजला आहे. त्यांच्या मते वृत्त-छंद इ.'चा विचार म्हणजे 'गतिविभ्रम', तर अलंकार-विचार म्हणजे 'स्थितिविभ्रम.' एरवी अनाग्रही असलेले प्रा. जोग विभ्रम या शब्दाबद्दल आग्रही आहेत. 'अलंकार' या रूढ शब्दातून एक बाह्य घटक, वाटल्यास धारण करावा, वाटल्यास काढून ठेवावा असे सुचविले जाते. प्रा. जोगांना काव्यातून अलंकार असे वेगळे करता येत नाहीत, असे वाटते. 'विभ्रम' हे शरीरगत असतात आणि ते शरीरापासून वेगळे करता येत नाहीत. वृत्तेही काव्यगतच असतात. जोगांचा या शब्दाबाबतचा विचार पटण्यासारखा असला तरी 'काव्यविभ्रम' हा शब्द रूढ झाला नाही हे मात्र खरे.

ज्या काळात काव्यातील अलंकारांचे ज्ञान असणे अभ्यासकांना अगत्याचे वाटत होते त्या काळात अनेकांची पुस्तके या विषयावर प्रसिद्ध झाली. 'काव्याची भूषणे' (म. वा. धोंड), 'अलंकार-प्रदीप' (ग. त्र्यं. देशपांडे-- य. गो. निजसुरे) ही त्यातली विशेष उल्लेखनीय. 'काव्यविभ्रम' यातही उठून दिसते. प्रत्येक अलंकाराच्या विवेचनाबरोबर त्याला भरपूर उदाहरणांची जोड प्रा. जोगांनी दिली आहे आणि विशेष म्हणजे त्यातील बरीच पद्यरचना प्रा. जोगांची आहे. एकोणिसाव्या शतकात वृत्तांची उदाहरणे देताना जे काम परशुरामपंत तात्या गोडबोले यांनी केले ते विसाव्या शतकात प्रा. जोग यांनी केले असे म्हणता येईल. पण जेव्हा कवितेतूनच अलंकार दिसेनासे झाले (फक्त गदिमांसारख्या जुन्या वळणाच्या कवीची कविता सालंकृत आहे.) तेव्हा अलंकारविषयक पुस्तकांनाही कोणी विचारीनासे झाले.

## अर्वाचीन मराठी काव्य

प्रा. जोग काव्यशास्त्राचे जाणकार म्हणून जितके ओळखले गेले त्यापेक्षाही मराठी काव्यपरंपरेचे इतिहासकार म्हणून त्यांची प्रसिद्धी आहे. कवितेची मूळची आवड, काव्यलेखनाचा

स्वत:चा छंद, काव्याच्या अध्यापनाचा नित्याचा अनुभव आणि कविपरंपरेबद्दल लिहाय-बोलायची मिळत गेलेली संधी यामुळे प्रा. जोगांच्या हातून कवितेची चर्चा-चिकित्सा नेहमीच होत गेली. नाशिकच्या लोकहितवादी मंडळाने 'प्रदक्षिणा' ग्रंथाचे संपादन केले त्यात काव्यावरील लेख प्रा. जोगांनी लिहिला. १९४४ मध्ये धुळ्याला भरलेल्या साहित्यसंमेलनाच्या निमित्ताने 'मराठी कविता १९१४-१९४४' (म्हणजे पहिले महायुद्ध ते दुसरे महायुद्ध) हे पुस्तक सिद्ध झाले. याही संग्रहात प्रा. जोगांनी काव्याचे प्रकरण लिहिले. मात्र या लेखात तीस वर्षांत काव्याच्या विविध प्रकारांचा कसकसा विकास (किंवा बदल) झाला या अंगाने पाहणी करण्यावर भर दिला आहे. मुंबई मराठी साहित्य संघाने वामन मल्हार जोशी स्मृतिव्याख्याने देण्याचे काम प्रा. जोगांवर सोपविले. त्यासाठी त्यांनी 'अर्वाचीन मराठी काव्याचा एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून वर्तमान कालापर्यंतचा आढावा' हा विषय निवडला. केशवसुतांच्या आधीच्या काळातील कवींची विस्तृत चर्चा यापूर्वी कधी झाली नव्हती. ती जोगांच्या प्रयत्नामुळे प्रथमच झाली. लेंभे, चिंतामणी पेठकर, टी माधवराव, पारखीशास्त्री इत्यादी कवींकडे त्यांनी प्रथमच लक्ष वेधले. केशवसुतांचे क्रांतिकारकत्व प्रा. जोगांना मान्य असले तरी इतरही अनेकांचे श्रेय कमीअधिक प्रमाणात आहे याचे विस्मरण त्यांनी होऊ दिले नाही. केशवसुत व त्यांचे समकालीन, गोविंदाग्रज-बालकवींची पिढी, त्यानंतरचे रविकिरण मंडळ व त्यातील महत्त्वाचे कवी या क्रमाने कुसुमाग्रज-बोरकर यांच्यापर्यंत मराठी काव्याची वाटचाल त्यांनी न्याहाळली आहे. मात्र असे करताना ठिकठिकाणची कविमंडळे, काव्यनिर्मितीचे सामूहिक प्रयत्न, विदर्भ-मराठवाडा, गोमंतक या ठिकाणची कविता; महाराष्ट्राबाहेरचे कवी, काव्याची विविध रूपे अशी चौफेर पाहणी या पुस्तकात त्यांनी केली असल्याने अर्वाचीन मराठी काव्याचे एका दृष्टिक्षेपात सम्यक् दर्शन घडण्याची व्यवस्था त्यांनी केली आहे. सगळे कवी काही सारख्या तोलाचे नसतात. त्यांच्या मर्यादा दाखवाव्याच लागतात. पण असे करताना प्रा. जोगांनी दोषैकदृष्टी व्यक्त केलेली नाही. उलट एखाद्याचे लहानसे श्रेय असले तरी ते नोंदण्याचे औदार्यच त्यांनी दाखविले आहे. एकंदरीने काव्याची समीक्षा आणि काव्याची विविधांगी रूपे यांचे विहंगम दर्शन या पुस्तकातून नेमकेपणाने घडले आहे.

'अर्वाचीन मराठी काव्य' १९४५ मध्ये प्रकाशित झाले. तोपर्यंतची म्हणजे कुसुमाग्रज-बोरकर आणि त्यांचे समकालीन कवी यांची कविता प्रा. जोगांना रुचेल अशीच होती. १९४५ पासूनच मराठीत नवकाव्याचा जमाना सुरू झाला. हे नवकाव्य आधीच्या परंपरांची आणि संकेतांची मोडतोड करीत होते. 'अभिरुची', 'सत्यकथा' मासिकांमुळे नवकाव्याला व्यासपीठही मिळाले होते. नवकाव्याचे स्वागत करणारा असा एक समीक्षकांचा वर्गही जोरात होता. वा. ल. कुलकर्णी यांच्याकडे त्याचे नेतृत्व होते. त्या वेळच्या बऱ्याच प्रस्थापित समीक्षकांना मात्र नवकाव्य आवडत नव्हते. ते दुर्बोध आहे, अश्रद्धता माजविणारे आहे, इतकेच नव्हे, तर ते अश्लील (किंवा बीभत्स) आहे असे नवकाव्यावर हल्ले होत होते. याउलट मर्ढेकर, पु. शि. रेगे आणि नंतर विंदा करंदीकर हे कवी नवकवींची बाजू जोरदारपणे

मांडत होते. १९५० ते १९६० हे दशक उलटसुलट चर्चेने गाजत होते. विरोधाला न जुमानता नवकाव्य स्थिर झाले आणि त्याला प्राधान्य देणारी नवी समीक्षा अस्तित्वात आली. (ही समीक्षा अधिकच दुर्बोध, बोजड आणि क्लिष्ट बनली होती.) नवकवींची दुसरी पिढीही स्थिर होऊ लागली होती. अशा काळात केशवसुतांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने मुंबई मराठी साहित्य संघाने प्रा. जोगांना केशवसुतांच्या स्मरणार्थ व्याख्याने देण्यासाठी निमंत्रित केले. काव्यसमालोचनाचा क्रम पुढे चालू ठेवायचा या हेतूने प्रा. जोगांनी 'मराठी कविता : १९४५ ते १९६५' असा विषय व्याख्यानासाठी निश्चित केला. त्यातून याच शीर्षकाचे पुस्तक सिद्ध झाले.

१९४५ ते १९६५ या दोन दशकांतल्या काव्याचे समालोचन करण्याचे काम प्रा. जोगांनी स्वीकारले आणि कर्तव्यबुद्धीने ते पारही पाडले. पण या काळातल्या कवितेशी ते मनाने समरस होऊ शकत नव्हते.

१९४५-६५ या काळावर नवकवींच्या पहिल्या पिढीचाच प्रभाव होता. त्यामुळे या पुस्तकात मर्ढेकर, य. द. भावे,.पु. शि. रेगे, विंदा करंदीकर, सदानंद रेगे इत्यादी कवींच्या कवितेवर अधिक भर आहे. आरती प्रभू, दिलीप चित्रे इत्यादी कवींनाही थोडेफार स्थान आहे, पण 'अर्वाचीन मराठी काव्य' या ग्रंथात महत्त्वाच्या कवींचे सर्व विशेष एकत्रितपणे नोंदले होते. तसे इथे न होता काव्याचा आशय, काव्यामागील भूमिका, प्रतिमांची गर्दी, भाषारूप आविष्कार आणि मग एकंदरीने कवितेत झालेला बदल या अनुरोधाने लेखकाने विवेचन केले आहे. प्रतिमांचे नावीन्य, प्रतिमांचा विचित्र संकर, भाषेची विक्षिप्त मोडतोड यांमुळे ही कविता सर्वसामान्य वाचकांपासून कशी दूर जात आहे, हे प्रा. जोगांना सोदाहरण दाखवावे लागले आहे. ज्या वातावरणात आणि ज्या संस्कारांत प्रा. जोग घडले आणि वाढले ते सगळे मागे पडल्यामुळे या नवकाव्यापासून ते मनाने दूरच नव्हेत, तर अलिप्त आहेत. त्यामुळे एकदा स्वीकारलेले काम तडीला न्यायचे हीच प्रा. जोगांची येथे भूमिका आहे. आवडत नसलेल्या कविताही त्यांनी प्रयत्नपूर्वक वाचल्या आणि समजावून घेण्याची शक्य ती सगळी धडपड केली, पण 'आमची कविता तुम्हांला आवडत (किंवा समजत) नसली तर ती तुमच्यासाठी नाही असे समजा. आमची कविता आमच्यासाठी आहे!'' असे वक्तव्य कवी करू लागल्यानंतर बोलणेच संपले. तरीही ते 'मुख्यार्थाची कैफियत' (कुणी ऐको न ऐको) मांडतच राहिले. जुन्या पठडीतल्या समीक्षकांना उद्देशून 'कविता कशी भोगावी?' हे सांगताना विंदा करंदीकर यांनी 'निर्वस्त्र होऊन' असे सांगितले होते. त्यावर प्रतिक्रिया व्यक्त करताना प्रा. जोगांनी ''ही क्रिया एकतर्फी होऊ शकत नाही'' असे बिनतोड उत्तर दिले होते! पण असला शाब्दिक वाद वाढविण्याचा जोगांचा स्वभाव नव्हता.

नवकाव्याविरुद्धची लढाई प्रा. जोग एकाकीपणेच लढत होते. कालांतराने हे सगळे थांबले. या पार्श्वभूमीवर आयुष्यभर चांगल्या कवितेच्या सहवासात रमण्याचे जे काम प्रा. जोगांनी केले ते त्यांना आणि रसिक वाचकांना सारखेच सुखवणारे ठरले. 'केशवसुत :

काव्यदर्शन' हा, केशवसुतांच्या उपलब्ध अशा सर्व कवितांचा परामर्श घेणारा ग्रंथ त्यांनी लिहिला आहेच. शिवाय 'हरपले श्रेय' या शीर्षकाने त्यांनी केशवसुतांच्या निवडक कवितांचे संपादनही केले आहे. केशवसुतांचे समर्थक, चाहते, भक्त यांच्याप्रमाणे त्यांचे आक्षेपक आणि विरोधक यांच्या मतांचीही सविस्तर चर्चा त्यांनी केली आहे. केशवसुतांच्या कवितांची काव्यविषयक कविता, प्रेमकविता, निसर्ग-कविता, सामाजिक आशयाच्या कविता आणि गूढगुंजनात्मक कविता अशी वर्गवारीही त्यांनी केली आहे. अशी वर्गवारी केल्यानेच कवितेचे खरे सौंदर्य कळते का, असा प्रश्न उपस्थित होऊ शकतो; पण सर्वसामान्य वाचकाची सोय होते, हे मात्र नाकारता येत नाही. जी गोष्ट केशवसुतांची तीच तांब्यांची. तांब्यांच्या समग्र कवितेप्रमाणे 'प्रणयप्रभा' शीर्षकाने त्यांच्या निवडक कवितांचे संपादनही त्यांनी केले आहे.

केशवसुत असोत की तांबे की आणखी कोणी कवी, याबाबत प्रा. जोगांवर असा आक्षेप घेतला जातो की, ते बाह्यांगपरीक्षा जितक्या काटेकोरपणे करतात, त्या मानाने काव्याच्या अंतरंगाला ते भिडत नाहीत. 'केशवसुत आणि तांबे' या पुस्तकात प्रा. जोगांचे समकालीन प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी हे नेमकेपणाने म्हटले आहे, पण जोगांबद्दल हा आक्षेप घेऊन उपयोग नाही. कारण कोणत्याही कलाकृतीच्या आस्वादात स्वत:ला विसरून जाण्याची, भान हरपण्याची त्यांची वृत्तीच नव्हती. सहृदयपणे, पण तटस्थपणे केलेले निरीक्षण, गुणदोषविवेचन आणि त्या अनुषंगाने घडणारे मूल्यमापन हाच त्यांच्या समीक्षेचा मूलधर्म होता. त्याला ते जागले यात शंका नाही. [प्रा. जोगांनी सर्वत्र कटाक्षाने 'समीक्षा' हाच शब्द वापरला. 'टीका' हा रूढ शब्द त्यांना समाधानकारक वाटत नव्हता. 'समीक्षा' या शब्दांत 'सर्व बाजूंनी आणि समग्रपणे न्याहाळणे' ही जी सूचना आहे तीच प्रा. जोगांना अन्वर्थक वाटत होती. कदाचित त्यामुळेच आता समीक्षा शब्द सर्वत्र स्वीकारला गेला आहे.]

केशवसुत, तांबे यांच्याप्रमाणे माधव जूलियन यांच्या काव्याचे संपादनही प्रा. जोगांनी साक्षेपाने केले. त्यातील 'समग्र माधव जूलियन' हा दोन खंडांतला ग्रंथ द. न. गोखले, सु. रा. चुनेकर यांच्या सहकार्याने त्यांनी सिद्ध केला. 'सुधारक' आणि विशेषत: 'विरहतरंग' या काव्यांचे संपादन त्यांनी स्वतंत्रपणे केले. माधव जूलियन हे प्रा. जोगांचे विशेष आवडते कवी. त्यातही 'विरहतरंग' हे खंडकाव्य त्यांना अधिकच प्रिय असे आहे. प्रियकर-प्रेयसी यांचा वियोग याच विषयावर आधारलेले 'मेघदूत' हे कालिदासाचे काव्य सर्वत्र वाखाणले गेले आहे. पण आश्चर्य म्हणजे 'मेघदूत'पेक्षा 'विरहतरंग' अनेक बाबतींत सरस आहे, असा पक्ष घेऊन प्रा. जोग आग्रहीपणाने लिहीत-बोलत असत. एरव्ही प्रा. जोग अनाग्रहीपणासाठी प्रसिद्ध आहेत; पण या बाबतीतला त्यांचा आग्रह विलक्षणच म्हटला पाहिजे. 'विरहतरंग'च्या संपादनातही बाह्यांग परीक्षणाला त्यांनी महत्त्व दिले आहेच.

कवी कुसुमाग्रज यांच्या सहकार्याने प्रा. जोगांनी 'काव्यवाहिनी' हे संपादन चार खंडांमध्ये केले. हेही एक त्यांचे महत्त्वाचे काम म्हटले पाहिजे. केशवसुतांपासून रविकिरण मंडळापर्यंत सुमारे ६० वर्षांतली निवडक मराठी कविता त्यांनी वाचकांपुढे ठेवली आहे. केवळ चांगले



अनुक्रमणिका

काव्य एवढाच निकष लावून हे संपादन केले असल्यामुळे त्या साठ वर्षांतील प्रातिनिधिक मराठी काव्य कोणते ते स्पष्ट झाले आहे. कवींची व कवितांची निवड करण्यात कुसुमाग्रजांचा सहभाग महत्त्वाचा असला, तरी या खंडांच्या प्रस्तावना व आनुषंगिक लेखन प्रा. जोगांच्या हातचे आहे, हे विवेचनाची पद्धत आणि भाषा यांवरून दिसून येते. हे काम आणखी काही वर्षे चालले असते, तर रविकिरण मंडळाच्या नंतरच्या कवितेचेही असेच दर्शन होऊ शकले असते. मराठीत कवितांची संपादने कितीतरी जाणकारांनी केली आहेत. त्यात 'काव्यवाहिनी'चे स्थान अजोड असेच आहे.

प्रा. जोग प्रामुख्याने अर्वाचीन काव्याच्या क्षेत्रात रमले, हे खरे असले तरी, कारणानुसार त्यांनी प्राचीन मराठी काव्याचाही वेध घेतला आहे. पुणे विद्यापीठातर्फे न. चिं. केळकर यांच्या स्मरणार्थ असलेल्या व्याख्यानमालेत १९५९ साली प्रा. जोगांनी दिलेल्या व्याख्यानांचे 'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन' हे पुस्तक सिद्ध झाले. डॉ. केतकर यांचे 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण' हे पुस्तक जसे स्वतंत्र प्रज्ञेचे दर्शन घडविणारे आहे, तसे अभिरुचीच्या दृष्टीने संपूर्ण प्राचीन मराठी काव्याची तपासणी करणारे हे पुस्तकही मूलत: चाकोरीबाहेरचे आहे. ज्ञानेश्वरांनी अभिरुचीचा जो महान आदर्श निर्माण केला तो नंतरच्या काळात टिकला नाहीच; पण उत्तरोत्तर अभिरुचीची प्रचंड घसरण होत जाऊन शाहिरांच्या काव्यात तिने हीन पातळी कशी गाठली याचे दर्शन प्रा. जोगांनी या पुस्तकात घडविले आहे. चांगली अभिरुची म्हणजे काही केवळ शृंगारवर्णनात सांभाळलेला संयम नव्हे. अभिरुची ही संकल्पना कशी विविधांगी आहे, हे त्यांनी प्रारंभी स्पष्ट केले आहे. जेथे सदभिरुची प्रकट झाली आहे, तेथे त्यांनी प्रशंसोद्गार काढले असले तरी कठोर टीका करावी, अशी पुष्कळ स्थळेही त्यांनी दाखवून दिली आहेत. या बाबतीत संत-पंडित-शाहीर असा कसलाही भेद त्यांनी केलेला नाही. रामदास नको इतकी लांबण लावून त्या विषयाचे सौंदर्य कसे बिघडवून टाकतात, भाषादृष्ट्या बेधडक चुकीचे प्रयोग कसे करतात आणि हास्यास्पद शब्द कसे वापरतात याची उदाहरणे देऊन प्रा. जोगांनी म्हटले आहे : "धसमुसळेपणा हे ईश्वरत्वाचे लक्षण असले तर रामदास हे शब्दसृष्टीचे ईश्वर आहेत, हे खरे." अशी खोचक विधाने या पुस्तकात जागजागी आली आहेत. शाहिरांनी आपला अविनय स्त्रीवर्गावर लादला (त्यामुळे उत्तान शृंगाराच्या लावण्या लिहिल्या गेल्या) याबद्दल नापसंती व्यक्त करताना ते विचारतात, "बिघडलेल्या नीतिमत्तेबद्दल आपण राज्यकर्त्यांना क्षमा करीत नाही, तर शाहिरांना का सूट द्यायची?"

प्राचीन मराठी साहित्याकडे केवळ अभिरुचीच्या संदर्भात पाहण्याचा हा एकमेव प्रयत्न आहे. अर्वाचीन साहित्याचीही अशीच तपासणी करण्याचा त्यांचा विचार होता, ते काम मात्र त्यांनी बाजूला ठेवले. एकंदरीने काव्यशास्त्र विवेचन, विशिष्ट कवीच्या काव्याची समग्र पाहणी, काव्याचा इतिहास, कवितांचे प्रातिनिधिक संपादन, नवकाव्यामुळे उद्भवलेल्या विवादात मांडलेली मुख्यार्थाची कैफियत आणि अभिरुचीदृष्ट्या काव्याची तपासणी असे चौफेर काम केवळ प्रा. जोग यांनीच केले असल्यामुळे ते गेल्या शंभर वर्षांतले आघाडीचे काव्यसमीक्षक ठरले आहेत.



अनुक्रमणिका

**लेखसंग्रह**

'अभिनव काव्यप्रकाश'पासून प्रा. जोगांचे सगळे लेखन ग्रंथरूपानेच झाले होते. याचा अर्थ त्यांनी केवळ ग्रंथरूप लेखन केले असे नव्हे. वेळोवेळी त्यांनी किती तरी स्फुटलेख लिहिले. वेगवेगळ्या नियतकालिकांमधून किंवा लेखसंग्रहांमधून त्यांना स्थान मिळत गेले. त्यांनी अनेक विस्तृत परीक्षणलेख लिहिले; त्या काळातल्या विविध वाङ्‌मयीन वादांमध्ये लेख लिहून आपली भूमिका मांडली. अनेक महत्त्वाच्या प्रसंगी केलेल्या भाषणांवरूनही लेख तयार केले. साहित्याचे स्वरूप, त्याचे प्रयोजन, वाङ्‌मयीन प्रवृत्ती, तात्त्विक चर्चा, व्यक्तिदर्शन, विशिष्ट वाङ्‌मय प्रकाराची चर्चा असे अनेकानेक विषय त्यांनी वेळोवेळी हाताळले आहेत. (असे असूनही त्यांनी कधी सदरलेखन केले असे दिसत नाही!) प्रा. जोगांचे असे शेकडो लेख त्या काळातल्या नियतकालिकांतच नव्हे, तर वृत्तपत्रांतही अडकून पडले आहेत. त्यांचा चिकाटीने शोध घेतला, तर पुष्कळ विचारधन हाती लागू शकेल. 'चर्वणा', 'विचक्षणा' व 'दक्षिणा' या नावाने प्रा. जोगांनी स्फुट लेखांचे तीन संग्रह प्रकाशित केले आहेत. ते नमुन्यादाखल होत असे म्हणता येईल. आपले दैनंदिन अध्यापनाचे आणि अन्य व्याप सांभाळून प्रा. जोग सतत वैचारिक लेखनात मग्न होते याची जाणीव होत राहते. अर्थात ज्या काळात प्रा. जोग वावरले तो काळ आजच्यापेक्षा पुष्कळच वेगळा होता. सामाजिक व वाङ्‌मयीन वातावरण पुष्कळच निकोप होते, तणावमुक्त होते. वैचारिक मतभेद युक्तिवादपूर्वक मांडले जात. त्याला व्यक्तिगत विद्वेषाची धार आली नव्हती. त्यातही प्रा. जोगांसारखे अभिरुचीसंपन्न समीक्षक समतोल विचारासाठी प्रसिद्ध होते. एखाद्या अनुभवी न्यायाधीशाने सर्व बाजू तपासून अचूक निवाडा करावा, असे प्रा. जोगांचे समीक्षालेखन मानले जात असे.

**म. सा. परिषदेचे कार्यकर्ते**

अनेक लेखक आयुष्यभर स्वतःमध्येच मग्न असतात. आपल्या लेखनापलीकडे त्यांना कशाचे अगत्य वाटत नाही. प्रा. जोग या प्रकारचे लेखक नव्हते. संस्थांच्या जीवनातही कर्तव्यबुद्धीने करता येण्यासारखे सर्व काही केले पाहिजे ही त्यांची वृत्ती होती. विशेषतः महाराष्ट्र साहित्य परिषदेशी त्यांचा दीर्घकाळचा संबंध होता. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा संपादक, परिषदेचा कार्याध्यक्ष आणि नंतर अध्यक्ष अशा महत्त्वाच्या सर्व पदांवर त्यांनी कामे केली. (डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा आजीव सदस्य या नात्याने व्यवस्थापकीय कामे ते पार पाडीत होतेच.) १९४९ ते १९५१ या काळात म. सा. परिषदेचा कार्याध्यक्ष असताना डांगी बोलीबद्दल एक महत्त्वाचा वाद उद्‌भवला होता. मुंबई राज्यात तेव्हा गुजराती आणि मराठी भाषक होते. डांगचे प्रशासन कोणत्या भाषेत करायचे? मराठीत की गुजरातीमध्ये हा एक जटिल प्रश्न निर्माण झाला होता. डांग जिल्हा हा वस्तुतः आदिवासी भाग. शिक्षणाचे प्रमाण अत्यल्प. आपली भाषा मराठीला जवळची आहे, एवढे डांगी जनतेला समजत होते, पण डांगच्या वनसंपत्तीचा लाभ गुजरातला झाला पाहिजे, या हेतूने गुजरातचे पुढारी डांगमध्ये हातपाय पसरत होते. डांगमध्ये गुजराती भाषेच्या शाळा सुरू करण्यात त्यांचा



अनुक्रमणिका

पुढाकार होता. डांगची गोरगरीब जनता काहीच मतप्रदर्शन करू शकत नव्हती. गुजराती लोकांच्या अपप्रचाराला उत्तर देण्यासाठी मसाप चा कार्याध्यक्ष या नात्याने प्रा. जोग यांनी डांगी बोलीबद्दल एक विस्तृत लेख लिहिला. (मराठीप्रमाणे इंग्रजीमध्येही) जॉर्ज ग्रियर्सन या इंग्रज अधिकाऱ्याने ५० वर्षांपूर्वी 'भारताची भाषिक पाहणी' या अपूर्व ग्रंथात डांगी बोलीचे जे नमुने दिले होते, ते आधारादाखल घेऊन त्यात मराठी वळणाचे शब्द किती व गुजरातीचे किती याची पाहणी प्रा. जोगांनी केली.

१९ व्या शतकातील भाषातज्ज्ञ 'एस्पर्सन'च्या मतांचा आधार त्यांनी घेतला. एखाद्या भाषेत दुसऱ्या भाषेतून कोणत्या प्रकारचे शब्द येऊ शकतात आणि कोणत्या प्रकारचे बहुधा येत नाहीत, याचे तत्त्व विचारात घेतले तर डांगीची जवळीक मराठीशीच आहे, गुजरातीशी नाही, असे प्रा. जोगांनी म्हटले आहे. उच्चारण, शब्दसंग्रह, प्रत्ययप्रक्रिया व विनिमय विरोधी शब्द यांच्या दृष्टीने डांगी बोली गुजरातीस प्रतिकूल आहे आणि मराठीस बव्हंशी अनुकूल आहे, असा निष्कर्ष प्रा. जोगांनी या लेखाच्या शेवटी काढला आहे.

कर्तव्यबुद्धीने प्रा. जोगांनी केलेले हे काम प्रशंसनीय असले तरी त्याला एक मर्यादा आहे. वस्तुत: जॉर्ज ग्रियर्सनने डांगीचा अंतर्भाव गुजरातीतही केलेला नाही की मराठीची ती बोली असेही म्हटले नाही, तर 'भिल्ली' या आदिवासी समाजाच्या बोलींमध्ये त्याने डांगीचा समावेश केला आहे. अशा परिस्थितीत या बोलीची नव्याने पाहणी करून तिथले लोकमत जाणून घेणे वस्तुत: इष्ट ठरले असते, पण भाषाभ्यास हे प्रा. जोगांचे क्षेत्र नसल्याने त्यांनी ग्रियर्सनचे उतारे तपासण्यावरच समाधान मानले.

## वाङ्मयेतिहासाचे संपादन

प्रा. जोगांनी म. सा. पत्रिकेचे संपादन कसोशीने करून पत्रिकेच्या प्रतिष्ठेला साजेसे काम केले यात शंका नाही, पण त्यांनी केलेले चिरस्थायी काम म्हणजे केवळ वादविवादातच अडलेली वाङ्मयेतिहासाची योजना त्यांनी मार्गी लावली हे होय. म. सा. परिषदेने १९४८ मध्येच 'समग्र मराठी वाङ्मयाचा इतिहास' ही योजना पार पाडायचे ठरविले होते, पण श्री. म. माटे एकीकडे आणि दि. के. बेडेकर, गं. बा. सरदार दुसरीकडे अशा मतभेदात काम अडून राहिले होते. असला वाद टाळून हे काम कुणी पार पाडायचे, हा प्रश्नच होता. शेवटी ही जबाबदारी परिषदेने एकमताने प्रा. जोगांवर सोपविली आणि त्यांना निर्णय घेण्याचे सर्वाधिकार दिले. प्रा. जोगांचे वाङ्मयेतिहासाबद्दलचे सुस्पष्ट विचार, संपादनाचा विपुल अनुभव, साहित्याच्या सर्व प्रकारांचा व्यासंग, तटस्थपणे मूल्यमापन करण्याचा स्वभाव, त्यांचे अजातशत्रुत्व आणि मुख्य म्हणजे त्यांना मानणारा कर्तबगार सहकाऱ्यांचा आणि विद्यार्थ्यांचा संच. ही सर्व अनुकूलता असल्यामुळे प्रा. जोगांनी प्रथम १८०० ते १८७४ हा चौथा आणि त्याच्यामागोमाग १८७४ ते १९२० हा पाचवा आणि १६८० ते १८०० हा तिसरा असे तीन महत्त्वाचे खंड दहा-बारा वर्षांत हातावेगळे केले.

ज्या काळात मोजकी महाविद्यालये होती, त्या काळातले रा. श्री. जोग प्राध्यापक

असल्यामुळे त्यांचा विद्यार्थिवर्ग सर्वत्र पसरला होता. असे शेकडो विद्यार्थी नंतर प्राध्यापक झाले तरी त्यांच्यामध्ये मित्रत्वाचे नाते होते. कुणाकडे कोणते काम सोपवावे, हे संबंधित विद्यार्थ्याचे आवडीचे क्षेत्र लक्षात घेऊन प्रा. जोगांनी ठरविले.

त्यातही संशोधन मार्गदर्शक असल्यामुळे प्रा. जोगांनी अनेकांकडून पीएच. डी. पदवीसाठी कसून काम करून घेतले होते. ल. म. भिंगारे (ह. ना. आपटे), द. न. गोखले (डॉ. केतकर), वि. वि. पटवर्धन (वाङ्मयीन संकेत), सु. रा. चुनेकर (माधव जूलियन), अ. वा. कुलकर्णी (मराठी नाट्यतंत्राची वाटचाल) हे आणि असे अनेक. गो. म. कुलकर्णी, व. दि. कुलकर्णी यांसारखे विद्यार्थी तर बरेच आधीपासूनचे. अशा सर्वांनी सोपविलेले काम पार पाडले हे ओघानेच आले.

जी प्रकरणे वेळेत हाती येणार नाहीत, असे प्रा. जोगांना वाटले ती त्यांनी स्वत: लिहिली. प्रत्येक खंडाचे प्रास्ताविक आणि समारोप हा भाग लिहिताना त्या त्या काळाचे आणि वाङ्मयीन घडामोडींचे अवधान त्यांनी किती कसोशीने राखले होते, हे दिसून येते. लेखसंग्रहाच्या रूपातील वाङ्मयेतिहासाला काही अंगभूत मर्यादा पडत असल्या तरी आपले काम प्रामाणिकपणे पार पाडल्याचे पुरेपूर समाधान त्यांना मिळाले.

लेखनवाचनाचा हा उद्योग त्यांनी अव्याहत केला. १९५२ मध्ये त्यांच्या उजव्या डोळ्याची दृष्टीच गेली. नंतरची २५ वर्षे त्यांनी फक्त एका डोळ्याला शिणवून काढली. कामाचे डोंगर उपसले, पण कसलीही सबब सांगितली नाही. 'कर्मयोग', 'साधना' असले आध्यात्मिक शब्द त्यांनी कधी उच्चारले नाहीत, पण ते कृतीत आणल्याशिवाय मात्र राहिले नाहीत.

प्रा. जोग हे कुटुंबवत्सल गृहस्थ होते. त्यांच्याकडील सर्वजणच आल्यागेल्याचे स्वागत करण्यात पुढे असत. मात्र खास जवळचे असे जोगांचे मित्र अगदी थोडे असावेत. श्री. रा. पारसनीस, दे. द. वाडेकर, प्रा. गजेंद्रगडकर हे त्यांतले काही, पण एका वेगळ्या प्रकारच्या मित्रमंडळात ते रमून जात. ना. गो. चापेकर मसापरिषदेचे कार्याध्यक्ष. ते आपल्या आईच्या स्मृतिदिवशी निवडक मित्रांना बदलापूरला आपल्याकडे बोलावून काव्यशास्त्रविनोदात दिवस घालवीत. या मित्रांमध्ये दत्तो वामन पोतदार, शं. दा. पेंडसे, के. ना. वाटवे, कृ. पां. कुलकर्णी, आचार्य अत्रे, रा. श्री. जोग आणि स्वत: चापेकर असे सगळे होते. सगळेच कर्तबगार आणि विद्याव्यासंगी, विशेष म्हणजे एक के. ना. वाटव्यांचा अपवाद सोडला, तर सगळ्यांना साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान मिळाला! 'बदलापूर मंडळ' या नावाने हे मंडळ प्रसिद्ध होते. (आचार्य अत्र्यांनी या बदलापूर मंडळाचे रंगतदार वर्णन 'कऱ्हेचे पाणी' मध्ये केले आहे.)

प्रा. जोगांना मिळण्यासारखे सगळे मानसन्मान मिळाले. मुंबई शहर व उपनगर संमेलनाचे ते अध्यक्ष झाले. सोलापूर जिल्हा साहित्य संमेलनाचेही अध्यक्षपद त्यांना मिळाले. मुख्य म्हणजे १९६० साली ठाण्याला भरलेल्या ४२ व्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची निवड झाली. एका सरळमार्गी विद्यासेवकाचा याहून कोणता सन्मान असणार?



अनुक्रमणिका

प्रा. जोगांनी आत्मपर असे काही लिहिले नाही. आत्मचरित्रलेखन तर दूरच. तसे त्यांच्याजवळ सांगण्यासारखे पुष्कळ होते. तऱ्हेतऱ्हेची माणसे भेटली होती. प्रवास घडले होते. जिवावरच्या आजारातून ते वाचले होते. काही विद्यार्थ्यांबद्दल पुष्कळ अपेक्षा बाळगल्या होत्या, पण त्या तशाच राहिल्या. दुसऱ्या एखाद्याने याबद्दल विस्ताराने लिहिले असते, पण स्वत:बद्दल बोलायचे म्हणजे "मी हे केले" अशी श्रेयाची भाषा वापरणे आले. ते त्यांना मानवणारे नव्हते. नाही म्हणायला, वा. रा. ढवळे यांचा गौरवग्रंथ म्हणून 'एका पिढीचे आत्मकथन'चे संपादन झाले, त्यात त्यांनी स्वत:बद्दल लिहिले आहे तेवढेच. याही लेखात आपल्या हातून कोणकोणते लेखन झाले त्याचा आढावा तेवढा त्यांनी घेतला आहे. तोही अगदी तटस्थपणे आणि त्रयस्थपणे. स्वत:बद्दल इतर काही सांगणे कटाक्षाने टाळले आहे.

या लेखाचा समारोप करताना त्यांनी म्हटले आहे : "मी जेवढे लिहिले त्या मानाने मला उदंड यश:प्राप्ती झाली आहे. त्यामुळे उपेक्षेचे वा वैफल्याचे दु:ख वाट्यास आलेले नाही. साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद लाभले, यापेक्षा गौरव तो काय असावयाचा! जे मिळाले त्यात मला समाधान आहे." आपली योग्यता असून पदरात काही पडले नाही, अशी करुणकथा ऐकवणाऱ्यांच्या जगात प्रा. रा. श्री. जोग केवळ अपवाद ठरतात! या औचित्यमार्गी, ज्ञानव्रती, विवेकी समीक्षकाचे मराठी साहित्यजगतावर अपार ऋण आहे.

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
२२ मनीषा गृहसंस्था, कर्वेनगर, पुणे ५२

---

## स्वागत

**लोकपरंपरा लोकधाटी,** संपादक मंडळ, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृ. २६४
**पहाटेचं स्वप्न,** डॉ. ल. मा. शिवणेकर, वाङ्मयसेवा प्रकाशन, नाशिक, पृ. ५६
**अतल,** डॉ. ल. मा. शिवणेकर, वाङ्मयसेवा प्रकाशन, नाशिक, पृ. ५६
**मज हृदयी सद्गुरू,** जयंत मरकळे, श्रीनिवास सेवामंडळ, पुणे, पृ. ३२
**विविध भारती,** नयनप्रभा, नयनप्रभा प्रकाशन, पृ. ४६
**प्रेषित,** विजय तरवडे, श्रीसमर्थ प्रकाशन, पुणे, पृ. ९५
**आरंभ,** मंगला गोडबोले, श्रीसमर्थ प्रकाशन, पुणे, पृ. १४२
**दोस्त माझा मस्त,** विजय तरवडे, श्रीसमर्थ प्रकाशन, पुणे, पृ. १४४
**श्रीराम देवी चिंतन,** शिरीष कवडे, श्रीवामनराज प्रकाशन, पुणे, पृ. २३६
**ज्ञानदेवांची शब्दकळा,** शिरीष कवडे, श्रीवामनराज प्रकाशन, पुणे, पृ. १६४
**प्राकृत मनन आणि आत्मचिंतन,** मामा देशपांडे, श्रीवामनराज प्रकाशन, पुणे, पृ. ७६

# व्यासंग, विश्लेषण आणि औचित्य यांचा त्रिवेणी संगम– प्रा. रा. श्री. जोग

❑

**प्रा. ग. प्र. प्रधान**

१९४० साली प्रा. रा. श्री. जोग सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजमधून फर्ग्युसन कॉलेजमध्ये आले आणि आमच्या कॉलेजच्या मराठी विभागाचा चेहरामोहोराच बदलून गेला. मी. बी. ए. ला इंग्रजी ऑनर्सच्या जोडीला मराठी विषय घेतला ते जोग सर शिकवणार म्हणून. महाराष्ट्रात त्या वेळी मराठीचे नावाजलेले प्राध्यापक म्हणजे मुंबईस रुईयाला न. र. फाटक, पुण्याला स. प. महाविद्यालयातील प्रा. श्री. म. माटे आणि डॉ. के. ना. वाटवे आणि आमच्या फर्ग्युसन कॉलेजचे प्रा. रा. श्री. जोग. आम्हांला कवी यशवंतांचे 'यशोधन' शिकवण्यापूर्वी जोगसरांनी काव्याची संकल्पना, मराठी काव्याची पूर्वपीठिका यावर काही व्याख्याने दिली. नंतर केशवसुतांच्यापासून अर्वाचीन मराठी काव्याचे बदललेले स्वरूप आणि रविकिरण मंडळाची वैशिष्ट्ये सांगितली आणि नंतर 'यशोधन' शिकविण्यास सुरुवात केली. रसग्रहण करतानाच प्रत्येक कवितेचे विश्लेषण सर करीत. त्यांच्या शिकवण्याच्या वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीमुळे आम्हा विद्यार्थ्यांना बौद्धिक शिस्त म्हणजे काय याचा प्रत्यय आला. ह. श्री. शेणोलीकर यांनी जोग सरांच्या टीकाशास्त्रावरील व्याख्यानांची माझ्याजवळ मुक्तकंठाने स्तुती केली. शेणोलीकरांच्यामुळेच मी जोग सरांनी लिहिलेले 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' हे पुस्तक वाचले. मी शेणोलीकरांना म्हणालो, 'पाश्चात्य लिटररी क्रिटिसिझम् इंग्रजीचे प्रा. म. गो. भाटे सर फार सुंदर शिकवतात. तरी देखील जोग सरांचे पुस्तक वाचल्यावर पाश्चात्यांच्या टीकाशास्त्राबरोबरच संस्कृत साहित्यशास्त्र नीट समजून घेतले पाहिजे हे मला कळले.''

जोग सर आमच्या 'साहित्य सहकार'च्या बैठकीस नियमाने येऊ लागले याचा आम्हांला फार आनंद वाटला. चर्चेसाठी आलेल्या साहित्याबाबत आम्ही विद्यार्थी अभिनिवेशाने बोलल्यानंतर जोग सर ज्या समतोलपणे चर्चेचा समारोप करीत त्यामुळे चिकित्सक विश्लेषण आणि सहृदयतेने केलेले आकलन यांचा समन्वय कसा होऊ शकतो, हे आम्हां विद्यार्थ्यांना समजू

लागले. जोगसर वृत्तीने गंभीर असले आणि होते त्यापेक्षाही अधिक गंभीर वाटत असले, तरी आम्हां विद्यार्थ्यांशी ते अत्यंत स्नेहाने वागत. आमची वाङ्मय मंडळाची सहल खडकवासल्याला गेली होती तेव्हा सर त्यांची 'अजुनि आठवे मजला ती स्पष्टपणे वेळ' ही त्यांच्या पहिल्या काव्यगायनावरची कविता म्हणाले, तेव्हा आम्ही सर्वजण खूष झालो आणि काहीसे चकितही झालो. माधव जूलियन हे माझ्या पिढीचे आवडते कवी. जोग सर आम्हांला म्हणाले, "तुम्ही सात-आठ विद्यार्थ्यांनी माधव जूलियनांची एकेक कविता घेऊन तिचे रसग्रहण लिहा आणि ते लेखन वाचून आपण त्यावर चर्चा करू." यावर आम्ही काही जण म्हणालो, "सर, आम्ही हे करूच परंतु आमचे सात-आठ निबंध वाचून झाल्यावर तुम्ही माधवरावांच्यावर विस्तृतपणे बोला." सरांनी ते मान्य केले. त्या दिवशी सरांनी 'संगमोत्सुक डोह' या कवितेचे रसग्रहण आणि 'माधव जूलियन यांचा मराठी कवितेच्या क्षेत्रातील प्रभाव' यावर बहारीचे भाषण केले. मी ऐकलेल्या अविस्मरणीय भाषणांपैकी ते एक भाषण होते.

१९४२ च्या स्वातंत्र्य चळवळीत कारावासातून सुटून आल्यावर मी एम. ए. च्या अभ्यासाला सुरुवात केली, तेव्हा फर्ग्युसन कॉलेजच्या लायब्ररीत जोग सर भेटले. अत्यंत आपुलकीने ते बोलले. मी एम. ए. ला बसणार आहे याबद्दल त्यांना समाधान वाटले होते. एम. ए. लाही दोन पेपर्स मी मराठीच घेतले आहेत, हे मी सांगितल्यावर सर म्हणाले, "पुस्तकाची कधी अडचण आली तर मला येऊन भेटा." मात्र अभ्यासाची आपुलकीने चौकशी करताना स्वातंत्र्य चळवळीबाबत ते एक शब्दही बोलले नाहीत. अर्थात मला याचे फारसे आश्चर्य वाटले नाही. मी एम. ए. ला. इंग्रजी घेऊन बसलेच पाहिजे हे सांगणारे आणि मला अभ्यासात सर्व प्रकारची मदत आणि मार्गदर्शन करणारे प्रा. एम. जी. भाटे सरांनीही चळवळीतील अनुभवाबद्दल कधी काही विचारले नव्हते. फर्ग्युसन कॉलेजच्या नेमस्त परंपरेस साजेसेच हे दोघांचे वागणे होते.

एम. ए. झाल्यावर मला फर्ग्युसन कॉलेजमध्येच अध्यापनाची संधी मिळाली. त्या वेळी सुरुवातीस माझ्या मनावर खूप दडपण आले. ज्या नामवंत प्राध्यापकांच्या हाताखाली मी शिकलो त्यांच्यासमवेत प्राध्यापकांच्या कॉमनरूममध्ये बसतानाही मला संकोच वाटे. परंतु जोगसर पहिल्याच भेटीत प्रेमाने म्हणाले, "आता तुम्ही आमचे सहकारी झालात." हळूहळू माझ्या मनातील संकोच दूर झाला याचे मुख्य कारण जोगांच्यासारखे ज्येष्ठ प्राध्यापक आणि माझे गुरू सहजतेने बरोबरीच्या नात्याने बोलत. त्या वेळी फर्ग्युसन कॉलेजमध्ये नव्यानेच शिकवायला लागलेल्या आम्हां समवयस्क तरुण प्राध्यापकांचा लहानसा गट होता. कॉमनरूममधील वातावरण मनमोकळे होते. एकत्र चहा पिताना हास्य-विनोद चाले. परंतु डी. डी. कर्वे, डी. डी. वाडेकर, जोग, पारसनीस आदी ज्येष्ठ मंडळींच्याबरोबर आदराचे अंतर राखूनच सुरुवातीची चार-पाच वर्षे मी वावरत असे. साहित्य सहकारमुळे जोग सरांशी अधिकच निकटचा संबंध आला. सर उत्तम लिहिणाऱ्या बुद्धिमान विद्यार्थ्यांना खूपच उत्तेजन देत. स. शि. भावे, शरच्चंद्र चिरमुले या दोघांवर त्यांची विशेषच मर्जी होती. मी महाराष्ट्र साहित्य

परिषदेत प्राज्ञ परीक्षेच्या विद्यार्थ्यांना काही पुस्तके शिकविली. त्या वेळी जोगसर, मला आठवते त्याप्रमाणे कार्याध्यक्ष होते. सरांच्या लेखनात जी बौद्धिक शिस्त आणि काटेकोरपणा होता तोच त्यांच्या परिषदेतील कामातही दिसून येई. १९४९ साली पुण्यालाच साहित्य संमेलन झाले होते. आचार्य जावडेकर त्या संमेलनाचे अध्यक्ष होते. आधुनिक काव्यावरच्या चर्चेत आचार्य अत्रे यांनी नवकाव्यावर आणि विशेषत: मर्ढेकरांच्यावर त्यांच्या खास शैलीत हवी तशी टीका केली. अध्यक्षीय समारोप करताना प्रा. रा. श्री. जोग त्यांच्या खास शैलीत म्हणाले, "नवकाव्यावर बोलताना आचार्य अत्रे म्हणाले की नवकाव्य आणि विशेषत: मर्ढेकरांची कविता त्यांना वाचवत नाही आणि त्यामुळे त्यांनी ती फारशी वाचलेली नाही. आचार्य अत्रे त्यांच्या भाषणात नेहमी अतिशयोक्ती करतात. परंतु या त्यांच्या विधानात मात्र अतिशयोक्ती नाही, हे त्यांच्या भाषणावरून आपल्या लक्षात आले असेलच."

प्रा. रा. श्री. जोग यांच्या शिष्यांच्यापैकी अनेक जण मराठीचे नामवंत प्राध्यापक आणि उत्तम लेखक होते. प्रा. गो. म. कुलकर्णी, प्रा. कृ. ब. निकुंब हे त्यांचे खास आवडते शिष्य आणि त्या शिष्यांनाही जोगसरांच्याबद्दल विलक्षण आदर आणि प्रेम. गो. म. कुलकर्णींच्या समवेत मी एकदा सरांच्याकडे गेलो होतो. त्या दिवशी सर ग. त्र्यं. देशपांडे यांच्या 'भारतीय साहित्यशास्त्र' या ग्रंथासंबंधी फार गौरवाने बोलले आणि म्हणाले, "भारतीय साहित्य शास्त्रावरच्या या ग्रंथाचा मराठीच्या सर्व प्राध्यापकांनी नीट अभ्यास केला पाहिजे. सरांना अनेक प्राध्यापकांच्या लेखनातील आणि अध्यापनातील उणिवा व मर्यादा अचूक ठाऊक होत्या. परंतु ते त्यासंबंधी खासगीतही कधी कुत्सितपणे बोलल्याचे मला आठवत नाही. सर त्यांच्या हाताखाली पीएच. डी साठी प्रबंध लिहिणाऱ्या विद्यार्थ्यांच्याकडून कसे कसोशीने वाचन व लेखन करून घेत आणि अनेकदा पुनर्लेखनही त्या विद्यार्थ्यांना करावयास लावीत हे मी पाहिले आहे. बौद्धिक शिस्त आणि औचित्य याचा मानदंड म्हणजे प्रा. रा. श्री. जोग अशीच त्यांची प्रतिमा मराठीच्या साहित्यक्षेत्रात होती. हे मात्र खरे की, रसिकतेच्या जोडीला उत्कटता मात्र सरांच्या स्वभावात पुरेशी नव्हती! श्री. के. क्षीरसागर यांचे विवेचन ऐकताना त्यांच्या वृत्तीतील काव्यानंदात बेहोष होण्याचा प्रत्यय येत असे. त्यामुळे विद्यार्थी आणि प्रगल्भ श्रोतेही मुग्ध होत. जोग सरांच्या भाषणात रेखीव विश्लेषण असे, परंतु श्रेष्ठ साहित्याच्या अंतरंगाचे दर्शन घडविण्यासाठी आवश्यक असलेली सौंदर्याच्या आस्वादात स्वत:ला हरपून टाकणारी भावोत्कट वृत्ती त्यांच्या स्वभावातच नव्हती. सरांच्या नर्म विनोदाचा प्रत्यय त्यांच्याबरोबरच्या संभाषणात येई, परंतु त्यांच्या व्याख्यानांचे स्वरूप व्यासंगी, गंभीर असेच असे. भावनेचा खळखळाट त्यांना आवडत नसे. बुद्धिनिष्ठा, तर्कसंगती या त्यांच्या स्वभाववैशिष्ट्यांचा परिणाम लेखनात आणि अध्यापनातही झाला होता.

प्रा. रा. श्री. जोग ज्या वेळी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले, त्या वेळी आम्हां त्यांच्या सर्व विद्यार्थ्यांना फार आनंद झाला. महाराष्ट्र साहित्य परिषदेत त्यांच्या सत्काराच्या वेळी प्रा. कृ. ब. निकुंब यांनी प्रा. रा. श्री. जोग हे समीक्षक व अध्यापक म्हणून

किती व कसे मोठे आहेत, हे फार सुंदर रीतीने सांगितले.

प्रा. रा. श्री. जोग हे पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्राध्यापक होतील, असे आम्हांला वाटले होते. परंतु ती निवड झाली नाही तरी पुणे विद्यापीठातील मराठी विभागाचा विकास व्हावा यासाठी सरांनी सतत मनापासून काम केले. निवडणुकीची धकाधक त्यांच्या स्वभावाला मानवणारी नव्हती. परंतु मराठीच्या बोर्ड ऑफ स्टडीजमध्ये जोग सरांनी किती मौलिक आणि महत्त्वाचे कार्य केले हे मी पुणे विद्यापीठाच्या कार्यकारिणीचा सदस्य असताना जवळून पाहिले आहे.

मी ज्या वेळी प्राध्यापकपदाचा राजीनामा देऊन सर्व वेळ राजकीय काम करावयाचे ठरविले त्या वेळी जोग सरांना भेटायला त्यांच्या घरी गेला होतो. ते म्हणाले, "तुमच्या मनातली राजकारणाबद्दलची ओढ तुम्हांला कधीतरी तिकडे नेणारच!"

डांग जिल्ह्याचा गुजराथेत समावेश करण्याचा निर्णय ज्या वेळी झाला त्या वेळी जोग सरांचे साहित्य परिषदेत फार प्रभावी भाषण झाले होते. डांगी बोली ही मराठीपासूनच कशी निर्माण झाली आहे, हे सरांनी त्यांच्या भाषणात सप्रमाण सिद्ध केले. प्रा. रा. श्री. जोग हे केवळ मराठीचे प्राध्यापक नव्हते. मराठी साहित्याच्या इतिहास-निर्मितीचे जे कार्य त्यांनी केले, त्या कार्यात लेखन आणि संपादन करताना सरांनी जे अविश्रांत श्रम केले ते ज्यांनी पाहिले आहे त्यांच्या मनातील सरांचे आदराचे स्थान कधीच ढळणार नाही. मराठी साहित्य आणि मराठी भाषा यांचे ते उत्कट अभिमानी होते आणि मराठीचे वैभव वाढविणे ही त्यांची जीवननिष्ठा होती. प्रा. रा. श्री. जोगांच्यासारख्या व्यासंगी, विद्वान प्राध्यापकांच्या हाताखाली शिकण्याचा आनंद मी उपभोगला. सरांनी माझ्यावर सतत लोभच केला. प्रा. जोगांसारखे एका ध्येयावर निष्ठा ठेवून आयुष्यभर व्यासंग करणारे प्राध्यापक हा आपल्या शिक्षणक्षेत्राचा मोठा आधार आहे. सरांचा फर्ग्युसन कॉलेजात मी सहकारी होतो. त्या वेळी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि व्यासंगाचा माझ्या मनावर मोठा संस्कार झाला. मराठी साहित्याच्या क्षेत्रात, मराठी साहित्याच्या अध्यापनाच्या क्षेत्रात प्रा. रा. श्री. जोग यांनी आयुष्यभर जे कार्य केले त्यामुळे त्यांच्या अनेक विद्यार्थ्यांना अक्षय प्रेरणा लाभली.

प्रा. रा. श्री. जोगसरांच्या पवित्र स्मृतीस विनम्र अभिवादन.

❑

---

## स्वागत

**श्रीदत्तलीलामृताधिसार,** मामा देशपांडे, श्रीवामनराज प्रकाशन, पुणे, पृ. ८८

**गुरुशिष्य संवाद,** मामा देशपांडे, श्रीवामनराज प्रकाशन, पुणे, पृ. ५२

**अंकशास्त्राची आनंद पद्धती,** शिरीष कवडे, श्रीवामनराज प्रकाशन, पुणे, पृ. ८८

**हिमगंगा आणि कमळाच्या कविता,** कृष्णा गुरव, पश्यंती प्रकाशन, कोल्हापूर, पृ. १३१

# 'चांद्रमसी प्रकृती'चे प्रा. रा. श्री. जोग

❑

डॉ. हे. वि. इनामदार

प्रा. रा. श्री. जोग यांचा विद्यार्थी होण्याचं भाग्य मला केवळ एक वर्षापुरतं लाभलं. १९४७-४८ या वर्षी धुळ्याच्या शाळेत नोकरी करून, नाशिकच्या महाविद्यालयात मी एम. ए. चं पहिलं वर्ष पुरं केलं. थोडेफार पैसे साठवून मी पुण्यास आलो. जून १९४८ मध्ये फर्ग्युसन महाविद्यालयात एम. ए. च्या दुसऱ्या वर्षासाठी नाव नोंदवलं. मराठी हा प्रमुख विषय मी निवडला होता. संस्कृत हा माझा दुय्यम विषय होता. त्या वर्षी आम्हा विद्यार्थ्यांना दोन दिवस फर्ग्युसन, दोन दिवस स. प.; आणि एक दिवस वाडिया अशा तीन महाविद्यालयांतून व्याख्यानं ऐकण्यासाठी जावं लागे.

'फर्ग्युसन' मध्ये जोग सर आम्हांला 'भाषाशास्त्र' हा विषय शिकवीत. त्या वेळी प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांचं 'मराठी भाषा : उद्‌गम आणि विकास' हे पुस्तक अभ्यासावं लागे. मराठीत तरी तेवढं एकच पुस्तक तेव्हा उपलब्ध होतं.

जोग सर त्या पुस्तकापलीकडची अन्य कितीतरी माहिती सांगत. आर्य भाषाकुल, द्रविड भाषाकुल, भारतातील अन्य भाषा-भगिनी, मराठीच्या बोली, व्युत्पत्तिशास्त्र, व्याकरणशास्त्र असे इतर कितीतरी विषय ते आम्हांला सोदाहरण स्पष्ट करून सांगत. भाषाशास्त्रासारखा काहीसा रूक्ष व जटिल विषय त्यांच्या व्याख्यानांतून आम्हांला समजत गेला.

त्या वर्षी मराठीला आम्ही एकूण सारे अठरा विद्यार्थी होतो. आम्हा सर्वांचे जोग सरांशी जवळचे आणि जिव्हाळ्याचे संबंध निर्माण झाले होते. 'एक वडीलधारे व वत्सल गुरुजन' अशीच त्यांच्याविषयी आमच्या मनात प्रतिमा होती.

साध्या संवादातूनही सूक्ष्म व स्वतंत्र चिंतन करण्याची सवय सरांनी आम्हांला लावली. एक प्रसंग सांगण्यासारखा आहे. त्या वर्षी वरेरकरांचे 'सत्तेचे गुलाम' हे नाटक नेमलेले होते. मला ते अगदी बेताचे वाटले. दुसरेच प्राध्यापक ते नाटक शिकवीत. पण एकदा जोग सरांना मी विचारलं, "हे सामान्य नाटक एम. ए. परीक्षेसाठी नेमलं आहे, याचं मला नवल वाटतं." सरांनी मंद स्मित केलं. थोडं थांबून ते म्हणाले, "साहित्य-समीक्षेचे सिद्धान्त तुम्ही

अभ्यासले आहेत. हे नाटक 'सामान्य' आहे, हे तुम्हांला त्या सिद्धान्ताच्या आधारे सांगता आलं पाहिजे. त्यासाठीच कदाचित ते नेमलेलं असावं!"

आपल्या विद्यार्थ्यांना धीर देणं, प्रोत्साहन देणं सरांच्या स्वभावातच होतं. त्या संदर्भातली माझी एक आठवण आहे. १९५४ साली मी ठाकरसी महिला महाविद्यालयात, मराठीचा कनिष्ठ व्याख्याता म्हणून नोकरीला लागलो. एका सकाळी फिरत फिरत जोगसर माझ्या घरी आले. चहापान झालं. ते मला म्हणाले, "साहित्य परिषदेत आणि अन्य सार्वजनिक ठिकाणी बोलावलं, तर तुम्ही जरूर बोलायला जा. त्यातून तुमचा आत्मविश्वास वाढेल; बाहेरच्या समाजाला तुम्ही माहीत व्हाल."

पुढल्या वर्षी इंटर आर्ट्ससाठी, प्रा. रा. भि. जोशी यांनी संपादित केलेलं 'आधुनिक मराठी गद्य' हे पुस्तक नेमलेलं होतं. पुण्यातल्या सर्व विद्यार्थ्यांसाठी एका युवा मंडळानं इंटर आर्ट्स मराठीसाठी व्याख्यानमाला आयोजित केली होती. स. प. महाविद्यालयाच्या वाचनालयात ती व्याख्यानं ठेवलेली होती. 'आधुनिक मराठी गद्य' या पुस्तकावर व्याख्यान देण्याचं निमंत्रण मी स्वीकारलं.

सुमारे तीनशे विद्यार्थी दाटीवाटीनं जमले होते. त्यात बहि:स्थ विद्यार्थ्यांचा भरणा जास्त होता. आरंभी माझी ओळख करून देण्यात आली. "हे मुलींच्या कॉलेजात शिकवतात," असे संयोजकानं सांगताच, अनेक विद्यार्थ्यांनी आरडाओरडा केला. तो दंगा थांबेना. मी कंठरवानं, उच्च स्वरात बोलू लागलो. मुलं ऐकून घेत नव्हती. पाच-सात मिनिटांतच माझा घसा बसला. मी शरमलो. तिथून मान खाली घालून बाहेर पडलो. थेट जोगसरांच्या घरी गेलो. झालेला सगळा प्रकार त्यांना सांगितला. सर शांतपणानं, समजावणीच्या सुरात मला म्हणाले, "हा तुमचा पहिलावहिला अनुभव आहे. असं होतं कधी कधी, पण तुम्ही मुळीच नाउमेद होऊ नका. मोठ्या समुदायापुढं बोलताना, केवळ उत्तम तयारी असून भागत नाही. श्रोत्यांचा रागरंग ओळखून, आणि प्रसंगाचा अंदाज घेऊन बोलावं. पुढल्या वर्षी तुम्ही हे निमंत्रण घ्याच. तुम्हांला यश येईल."

–आणि तसंच झालं. श्रोत्यांचं, विशेषत: गर्दीचं मानसशास्त्र ओळखून बोललं पाहिजे, याची खूणगाठ मी मनाशी बांधली. तिथून पुढं सारं सोपं होत गेलं.

आणखी एक प्रसंग सांगण्यासारखा आहे. एका प्रसिद्ध वक्त्याचं शब्दबंबाळ भाषण ऐकून माझी निराशा झाली. ते शब्दप्रभू होते. लाह्या फुटाव्यात, तसे ते तावातावानं बोलत होते. माझी प्रतिक्रिया जोगसरांजवळ मी व्यक्त केली. त्यावर ते एवढंच म्हणाले, "शब्दांवर प्रभुत्व असणं हे जसं चांगलं आहे, तसाच त्यात एक धोकाही असतो. बोलण्याच्या ओघात मूळ विषय बाजूला जातो; आणि मग, संत नामदेवांनी म्हटल्याप्रमाणे, 'टाळ-मृदंग दक्षिणेकडे। माझें गाणें पश्चिमेकडे', अशी गत होते. तेव्हा या बाबतीत आपण सावध राहिलं पाहिजे."

आपल्या विद्यार्थ्यांबद्दल जोग सरांना अतिशय आस्था वाटत असे. माझे दोन अनुभव सांगण्यासारखे आहेत.



अनुक्रमणिका

दिनांक २९ मार्च १९५१, गुरुवार या दिवशी, आमच्या गावी माझं लग्न झालं. व्यक्तिगत पत्रासह मंगलपत्रिका पुण्यास सरांकडे मी आधीच पाठविली होती. दि. २४ मार्च १९५१ या दिवशी त्यांनी लिहिलेलं पत्र मला मिळालं. पत्रात सरांनी पुढील शब्दांत आपली सदिच्छा व्यक्त केली होती : "योग्य वेळी जीवनाच्या नव्या आश्रमात तुम्ही प्रवेश करीत आहात. त्या आश्रमात तुमच्या आधी २५ वर्षे मी प्रविष्ट झालो आहे. गृहस्थाश्रमात असलेल्यांच्या वतीने मी आपले दोघांचे मन:पूर्वक स्वागत व अभिनंदन करतो. तुमचे जीवन सुखाचे, यशस्वी, आणि दीर्घ होवो, अशी आमची इच्छा आहे. अधिक काय लिहिणे?"

दुसरी आठवण आहे, ती माझ्या प्रबंधाच्या संदर्भातील, 'संत नामदेव' या विषयावर डॉक्टरेटसाठी मी अभ्यास करीत होतो. गाथेची 'आवटे प्रत' मजजवळ होती, पण चित्रशाळेची जोग प्रत मला हवी होती. सरांजवळ मी हे सहज बोललो. विष्णुबुवा जोग यांनी स्वत: ती प्रत सरांच्या वडिलांना दिली होती. सरांनी कपाटातून ती प्रत काढली; आणि मला दिली. "तुमचं काम झाल्यावर सावकाश ही प्रत परत करा. आणखी काही लागलं, तरी मला सांगा."

आपल्या साहित्य-सेवेला सरांनी प्रारंभ केला, तो काव्यानं. 'ज्योत्स्नागीत' आणि 'निशागीत' हे त्यांचे सुरुवातीचे काव्यसंग्रह. अगदी शेवटी, शेवटी त्यांनी आपल्या उरल्यासुरल्या कविता संकलित केल्या; आणि 'साराच वेडेपणा!' या नावानं त्या कवितांचा छोटासा संग्रह काढला. एका सकाळी घरी येऊन तो संग्रह त्यांनी मला दिला. मी त्यांना विचारलं, "तुम्ही प्रथम काव्यरचना केली. पुढं ती थांबवली. नंतर तुम्ही समीक्षा-लेखनाकडं वळला. हे सारं कसं काय झालं?"

सर नेहमीप्रमाणं थोडे थांबले. हसून ते म्हणाले, 'A Critic is a failed poet,' हे वचन तुम्हांला माहीत आहे ना? तसंच काहीसं झालं असावं!" स्वत:कडं, अशा तटस्थपणानं पाहणं हे जोगसरच करू जाणे!

मे १९६० मध्ये ठाणे इथं मराठी साहित्य संमेलन भरलं होतं. जोग सर संमेलनाचे अध्यक्ष होते. संमेलनाच्या मंडपात आम्ही पाच-सहा मित्र गप्पा मारत बसलो होतो. तेवढ्यात डॉ. ल. म. भिंगारे हे तिथं आले. मी मित्रांना म्हणालो, "हे आहेत, 'हरिभाऊ' भिंगारे." (हरिभाऊ आपटे यांच्यावरील भिंगारे यांचा उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध झाला होता.) डॉ. भिंगारे मनोमन खूष झाले. आमच्या दिशेनं जोग सर येत होते. भिंगारे आम्हांला म्हणाले, 'क्षेमेंद्र' जोग येत आहेत!"

डॉ. भिंगारे यांनी सहजपणे जे म्हटलं, ते सर्वस्वी सार्थ होतं. वामन मल्हारांचा जसा सौजन्यविवेक, तसाच जोग सरांचा औचित्यविचार. तो त्यांच्या व्यक्तित्वाचा जणू स्थायीभावच होता. त्यामुळं 'औचित्यविचार'कार क्षेमेंद्र आणि जोगसर या दोघांतील अनुबंध उत्कटच म्हटला पाहिजे.

जोग सरांच्या सत्त्वसंपन्न व्यक्तिमत्त्वाचं वर्णन प्राचार्य रँग्लर ग. स. महाजनी यांनी

मार्मिकपणे केलं आहे. एका सभेत रँग्लर महाजनी म्हणाले, "फर्ग्युसन कॉलेजमध्ये मी प्राचार्य असताना, प्रा. रा. श्री. जोग हे मराठीचे प्राध्यापक होते. शांत, समाधानी अशी त्यांची मनोवृत्ती होती. प्रगल्भ मनाचे, गाढ व्यासंगाचे, उच्च अभिरुचीचे, रसिक हृदयाचे ते समीक्षक होते. ते 'चांद्रमसी प्रकृती'चे होते."

'चंद्रमस्' म्हणजे चंद्र. 'चांद्रमसी प्रकृती' म्हणजे चंद्राप्रमाणे प्रशान्त व आल्हाददायक वृत्ती. ज्ञानदेवांनीही आपल्या 'पसायदाना'त 'अलांछन चंद्रमे' असं वर्णन केलं आहे. जोग सर अशाच प्रकृतीचे होते. त्यांची वृत्ती प्रसन्न आणि प्रेरक होती.

असे हे जोग सर आम्ही पाहिले; त्यांनी आम्हा विद्यार्थ्यांवर वाङ्मयीन अभिरुचीचे आणि सदाचाराचे संस्कार केले.

'–भाग्य आम्ही तुका देखियेला!'


**डॉ. हे. वि. इनामदार**

६०/१५ भारती निवास कॉलनी, एरंडवणे, पुणे ४११००४.


❑

# प्रा. रा. श्री. जोग : जीवन, कार्य आणि संस्मरण

❑

(संकलक : डॉ. सु. रा. चुनेकर)

## (अ) प्रा. रा. श्री. जोग– जीवनपट

| | |
|---|---|
| १९०३, मे १५ | जन्म, आजोळी, गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर. |
| १९०४ | वडील श्रीपाद बाजी जोग यांच्या नोकरीच्या गावी, अक्कलकोट, जि. सोलापूर, येथे आगमन. |
| १९०४ ते १९१८ | अक्कलकोट येथे बाल्य आणि शिक्षण. |
| १९१८ मार्च | वडील पुण्यास नोकरीनिमित्त आल्यावर, न्यू इंग्लिश स्कूल, पुणेमध्ये मॅट्रिकच्या वर्गात प्रवेश. |
| १९१९ जून | मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण होऊन फर्ग्युसन महाविद्यालयात प्रवेश. |
| १९२३ जून | मुंबई विद्यापीठाची बी.ए. परीक्षा संस्कृत (विशेष) आणि मराठी विषय घेऊन उत्तीर्ण. |
| १९२५ मे | मुंबई विद्यापीठाची एम.ए. परीक्षा संस्कृत आणि मराठी हे विषय घेऊन उत्तीर्ण. |
| १९२६, मे २६ | विवाह, कु. मैना गोविंद ओक (विवाहोत्तर नाव ज्योत्स्ना) यांच्याशी पुणे, येथे. त्याच वेळी 'ज्योत्स्नागीत' हा कवितासंग्रह प्रकाशित. |
| १९२६ जून ते १९३२ जून | हंसराज प्रागजी ठाकरसी महाविद्यालय (नाशिक) येथे संस्कृत व मराठी या विषयांचे अध्यापन. |
| १९३२ जून | नाशिक सोडले. फर्ग्युसन महाविद्यालयात संस्कृत व मराठीचे प्राध्यापक म्हणून नियुक्ती. |
| १९३३ जून | फर्ग्युसन महाविद्यालयातून विलिंग्डन महाविद्यालय, सांगली येथे बदली. |
| १९३३ ते १९४० | विलिंग्डन महाविद्यालयामध्ये अध्यापन. १९४० मध्ये पुन्हा फर्ग्युसन महाविद्यालयात बदली. |

| | |
|---|---|
| १९४० ते १९६३ | फर्ग्युसन महाविद्यालयामध्ये अध्यापन. १९६३ जून– निवृत्त. षष्ट्यब्दिपूर्ती. |
| १९४३ ऑक्टोबर | मुंबई आणि उपनगर साहित्य संमेलन, दादर, अधिवेशन, अध्यक्ष. |
| १९४३ ते १९४५ | 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'चे संपादन. |
| १९४८ डिसेंबर | सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन, अध्यक्ष. |
| १९४९ ते १९५१ | कार्याध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे. |
| १९५२ फेब्रुवारी | डिटॅचमेंटमुळे उजव्या डोळ्याची दृष्टी गेली. |
| १९५९ डिसेंबर | मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, वार्षिक समारंभ– अध्यक्ष. |
| १९६० मे, ७, ८, ९, १० | ठाणे येथे भरलेल्या बेचाळिसाव्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. |
| १९६३ जून | विद्यापीठ अनुदान मंडळाकडून निवृत्त-शिक्षक-योजनेमध्ये पुणे विद्यापीठामध्ये नियुक्ती. |
| १९७७, फेब्रुवारी २१ | मृत्यू, पुणे येथे. |

('साहित्यविचार' (प्रा. रा. श्री. जोग गौरवग्रंथ) च्या आधारे)

## (आ) प्रा. रा. श्री. जोग यांचे वाङ्मय

### साहित्यविचार व समीक्षा

**ग्रंथ**

:

| | | |
|---|---|---|
| १. | अभिनव काव्यप्रकाश | १९३० सप्टेंबर |
| २. | सौंदर्यशोध आणि आनंदबोध | १९४३ |
| ३. | काव्यविभ्रम (वृत्ते आणि अलंकार) | १९५१ ऑक्टोबर |
| ४. | अर्वाचीन मराठी काव्य (केशवसुत आणि नंतर) | १९४६ |
| ५. | केशवसुत (काव्यदर्शन) | १९४७ |
| ६. | मराठी कविता : १९४५-१९६५ | १९६७ ऑक्टोबर |
| ७. | मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन | १९५९ |
| ८. | संस्कृत काव्यवाङ्मय | १९४५ |

### लेखसंग्रह

| | | |
|---|---|---|
| ९. | चर्वणा (वाङ्मयविषयक निबंध) | १९६० मे |
| १०. | विचक्षणा | १९६२ डिसेंबर |
| ११. | दक्षिणा | १९६७ |

१२. साहित्यविषयक काही प्रश्न — १९७५ एप्रिल

१३. वाङ्मय-विमर्श — १९८९ फेब्रुवारी २१

(संपादक : डॉ. द. न. गोखले, डॉ. दत्तात्रय पुंडे, डॉ. जयंत वष्ट)

**संपादने**

१४. विरहतरंग (माधव जूलियन), आ. ३, १९४८ सप्टेंबर

१५. सुधारक (माधव जूलियन), आ. ३, १९६२ मार्च

१६. हरपलें श्रेय (केशवसुतांच्या निवडक कवितांचा संग्रह) १९५६

१७. समग्र माधव जूलियन, खंड १,२ (संपादक : रा. श्री. जोग, द. न. गोखले, सु. रा. चुनेकर) — १९७७ जानेवारी २१

१८. काव्यवाहिनी खंड १ (१९५१), खंड २ (१९५३), खंड ३ (१९६२)
(सहसंपादक : कुसुमाग्रज)

१९. साहित्यसंपदा– ३ पुस्तके

१९अ. मराठी समीक्षा (वा. ल. कुलकर्णी, श्री. पु. भागवत यांसह) १९७२

२०. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड ३ (इ. स. १६८० ते १८०० या कालखंडातील मराठी वाङ्मयाचा विवेचक इतिहास) १९७३

२१. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड ४ (इ. स. १८०० ते १८७४) — १९६५ जून

२२. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड ५, भाग १ (इ. स. १८७५ ते १९२०) — १९७३

२३. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड ५, भाग २ (इ. स. १८७५ ते १९२०) — १९७३

**काव्यसंग्रह**

२४. ज्योत्स्नागीत — १९२६

२५. निशागीत — १९२८

२६. साराच वेडेपणा — १९७४ मे १५

**इतर**

२७, २८, २९, भाषाविकास पुस्तक पहिले (जानेवारी १९५५), पुस्तक दुसरे (जानेवारी १९५५), पुस्तक तिसरे (१९५५)

(या यादीसाठी 'प्रा. जोग यांचे वाङ्मय'– ललिता भावे, 'प्रा. रा. श्री. जोग– गौरवग्रंथ' या सूचीचा उपयोग करून घेतला आहे) पृ. ७९-८१

**प्रा. रा. श्री. जोग : संदर्भ– वाङ्मय**

साहित्यविचार (प्रा. रा. श्री. जोग गौरवग्रंथ)

संपादक : द. न. गोखले, स. शि. भावे, स. कृ. पाध्ये १५ मे १९६४
स्मरणिका– रा. श्री. जोग स्मारक समिती
मुंबई– उपसमिती १९७८
पुनर्भेट– संपादक : गोविंद जोशी १९७९

**(इ) प्रा. रा. श्री. जोग– स्मारक समिती**

**प्रा. रा. श्री. जोग समीक्षा-पारितोषिक प्राप्त ग्रंथ**

| | ग्रंथनाम | ग्रंथकर्ता | वर्ष |
|---|---|---|---|
| १) | वामन मल्हार आणि विचार सौंदर्य | प्रभाकर पाध्ये | १९७९ |
| २) | सृष्टि, सौंदर्य आणि साहित्यमूल्य | शरच्चंद्र मुक्तिबोध | १९७९ |
| ३) | सौंदर्यानुभव | प्रभाकर पाध्ये | १९८० |
| ४) | कवितारती | विजया राजाध्यक्ष | १९८१ |
| ५) | आजकालचे साहित्यिक | गंगाधर गाडगीळ | १९८२ |
| ६) | कविता आणि प्रतिमा | सुधीर रसाळ | १९८३ |
| ७) | चिं. त्र्यं. खानोलकरांच्या शोधात | जया दडकर | १९८४ |
| ८) | रामदास : प्रतिमा आणि प्रबोध | त्र्यं. वि. सरदेशमुख | १९८५ |
| ९) | ऊर्जायन | द. ग. गोडसे | १९८६ |
| १०) | ग्रेस आणि दुर्बोधता | जयंत परांजपे | १९८७ |
| ११) | चंद्र चवथीचा | म. वा. धोंड | १९८८ |
| १२) | कथाकार शांताराम | रा. भा. पाटणकर | १९८९ |
| १३) | कॉडवेलचा कलाविचार | अशोक कृष्णाजी जोशी | १९९० |
| १४) | टीकास्वयंवर | भालचंद्र नेमाडे | १९९१ |
| १५) | कोरा कॅनव्हास | प्रभाकर बरवे | १९९२ |
| १६) | इब्सेन : व्यक्ती आणि नाटक | अनिरुद्ध कुलकर्णी | १९९३ |
| १७) | शारदीय चंद्रकळा | त्र्यं. वि. सरदेशमुख | १९९४ |
| १८) | आधुनिक मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी | गो. म. कुलकर्णी | १९९५ |
| १९) | कविता आणि रसिकता | रा. ग. जाधव | १९९६ |
| २०) | शैलीशास्त्रज्ञ भामह | वा. के. लेले | १९९७ |
| २१) | साहित्याची भूमी | श्री. पु. भागवत (संपादक : वासंती मुझुमदार) | १९९८ |
| २२) | साहित्यवेध | के. रं. शिरवाडकर | १९९९ |
| २३) | अर्वाचीन मराठी काव्यदर्शन | अक्षयकुमार काळे | २००० |

| | | | |
|---|---|---|---|
| २४) | शोकात्म विश्वरूप दर्शन | स. रा. गाडगीळ | २००१ |
| २५) | कथा संकल्पना आणि समीक्षा | सुधा जोशी | २००२ |
| २६) | इंदिरा यांचे काव्यविश्व | म. सु. पाटील | २००३ |

[१९९२ पासून पारितोषिक-व्यवस्थापन म. सा. परिषदेकडे]

**(ई) मराठी विभाग— पुणे विद्यापीठ**

**प्रा. रा. श्री. जोग स्मृति-व्याख्यानमाला**

| | वर्ष | वक्ते | विषय |
|---|---|---|---|
| १) | १९८५ | प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी | उद्घाटन : वाङ्मयेतिहासाची संकल्पना |
| २) | १९८६ | प्रा. डॉ. के. पां. जोग | रससिद्धांताच्या चार वाटा |
| ३) | १९८७ | प्रा. गो. म. कुलकर्णी | वाङ्मयीन अभिरुची : काही प्रश्न |
| ४) | १९८८ | प्रा. शान्ता ज. शेळके | आधुनिक मराठी कवितेतील प्रेमकल्पना |
| ५) | १९८९ | प्रा. के. रं. शिरवाडकर | मार्क्सवाद आणि मराठी साहित्य |
| ६) | १९९० | प्रा. डॉ. पद्माकर दादेगावकर | ज्ञानेश्वरीची रससमीक्षा |
| ७) | १९९१ | प्रा. रमेश तेंडुलकर | बालकवींच्या सौंदर्यजाणिवेचा शोध[१] |
| ८) | १९९२ | प्रा. डॉ. विजया राजाध्यक्ष | तीन ऋणानुबंधी : बालकवी, मर्ढेकर, आरती प्रभु |
| ९) | १९९३ | प्रा. डॉ. वि. ना. ढवळे | भाषा-साहित्य-समीक्षा[२] |
| १०) | १९९४ | प्रा. डॉ. सुधीर रसाळ | मर्ढेकरांची कविता |
| ११) | १९९५ | श्री. अनिरुद्ध कुलकर्णी | निसर्गप्रेषित कवी वर्डस्वर्थ : भेटलेला, न भेटलेला आणि पुन्हा भेटलेला |
| १२) | १९९६ | प्रा. रा. ग. जाधव | मराठी कवयित्रींची कविता : १९८० ते १९९५[३] |
| १३) | १९९७ | प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी | ज्ञानेश्वर : काव्यरूपे आणि आस्वादप्रक्रिया |
| १४) | १९९८ | प्रा. ग. प्र. प्रधान | १) वाङ्मयातील आशय आणि अभिव्यक्ती<br>२) लेखकाचे व्यक्तिमत्त्व आणि वाङ्मय<br>३) साहित्य आणि समाजजीवन |
| १५) | १९९९ | श्री. विश्वनाथ खैरे | साहित्य, मिथ्य साहित्य |
| १६) | २००० | प्रा. डॉ. अरविंद वामन कुलकर्णी | प्रा. रा. श्री. जोग : व्यक्ती व वाङ्मय |
| १७) | २००० | प्रा. डॉ. सरोजिनी वैद्य | वासुदेव बळवंत पटवर्धन : व्यक्ती व वाङ्मय |
| १८) | २००१ | प्रा. डॉ. गो. मा. पवार | १) विनोदविषयक उपपत्तींची मीमांसा |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | २) विनोद संकल्पनेची नवी मांडणी |
| | | | ३) मराठी विनोदाची परंपरा |
| १८) | २००२ | प्रा. डॉ. प्रभा गणोरकर | स्त्रीवादी दृष्टिकोन आणि मराठीतील स्त्रियांचे लेखन |
| १९) | २००३ | प्रा. डॉ. गंगाधर पानतावणे | शरच्चंद्र मुक्तिबोध यांचे साहित्य |

❑

**पुस्तकरूपाने प्रकाशित व्याख्याने :**

१. 'बालकवींची कविता : तीन संदर्भ– प्रा. रमेश तेंडुलकर, मौज प्रकाशन, मुंबई १८-१२-१९९९

२. 'साहित्याचे नवीन भाषातत्त्वज्ञान' – डॉ. वि. ना. ढवळे ,कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे १९९७

३. 'आधुनिक मराठी कवयित्रींची कविता' प्रा. रा. ग. जाधव, प्रतिमा प्रकाशन, पुणे १-९-१९९६.

**'पुणे ऐतिहासिक वास्तु स्मृती समिती'**च्या वतीने म्युनिसिपल कॉलनी, पुणे ४ येथील **'समीक्षा'** या निवासस्थानी प्रा. रा. श्री. जोगांचे वास्तव्य असल्याबद्दलच्या नीलफलकाचे अनावरण दि. **१५-५-२००१.'**

❑

---

## स्वागत

**इहलोकीची यात्रा,** सुधीर सुखटणकर, श्रीसमर्थ प्रकाशन, पुणे, पृ. १३८
**प्राजक्ताची फुले,** सुधीर जोग, सुनीता प्रकाशन, ठाणे, पृ. ७२
**सनसेट,** अशोक आहेर, नवभारत प्रकाशन, मुंबई, पृ. ५६
**जमावबंदी,** सय्यद अल्लाउद्दीन, दिलराज प्रकाशन, पुणे, पृ. ५६
**पांगुळ,** ना. बा. रणसिंग, मनोशिल्प प्रकाशन, पृ. ९६
**पाऊस,** अरुण शेवते, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृ. ६४
**वसंत कानेटकरांची नाटके,** रा. भा. पाटणकर, मौज प्रकाशन, मुंबई, पृ. १५९
**मण्यांची माळ,** सुनीता देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई, पृ. ११७
**राज्यघटनेचे अर्धशतक,** नरेंद्र चपळगावकर, मौज प्रकाशन, मुंबई, पृ. १७७
**वादळवेल,** ज्ञानेश्वर कुलकर्णी, विद्याविहार प्रकाशन, कोल्हापूर, पृ. १११
**समर्पण,** ल. का. मोहरीर, सर्जेगुरुजी प्रतिष्ठान, नांदेड, पृ. १८५
**गुलमोहोर,** सरिता सडेकर, श्रीसमर्थ प्रकाशन, पुणे, पृ. ३२
**आनंदाचा खाऊ,** सरिता सडेकर, श्रीसमर्थ प्रकाशन, पुणे, पृ. ११२
**संवाद,** विजय कुवळेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृ. २१३

# वेगळ्या रंगाचा आगळा कवी

❑

प्रा. सुहासकुमार बोबडे

जगाला स्वत:च स्वत:ची ओळख करून देत असताना तो स्वत:बद्दल अगदी सहज स्वाभाविकपणे म्हणून जातो की,

*'रंगुनी रंगात साऱ्या रंग माझा वेगळा।*
*गुंतुनी गुंत्यात साऱ्या पाय माझा मोकळा।'*

(रंग माझा वेगळा– 'रंग माझा वेगळा')

जो कवी आत्मभान ठेवून लिहिणारा असतो त्याच्या कवितेत स्वाभाविकपणे त्याच्या मनाच्या कोंदणात जे काही जडलेले असते ते चमकल्याशिवाय राहत नाही. सुरेश भटांच्या ह्या काव्यात्म उद्गाराचेही अगदी तसेच आहे असे मला वाटते. आधीच मळलेल्या आणि विशिष्ट वळणांवरून वळलेल्या वाटांवरून चालणारे बेधडक चालू शकतात. परंतु ज्याला स्वत:च स्वत:ची वाट चोखाळावी लागते, अवघड घाटांवर वळणे तयार करावी लागतात, त्याचे चालणे कसे बरे बेधडक असणार? त्याला बिकट वाटेनेच चालावे लागणार. मात्र त्याची ती बिकट वाट निश्चितच वेगळी ठरणार यात शंकाच नाही. मग अशा वाटेने चालणाऱ्याला आपण कुठे चाललो आहोत हे न विचारता सांगणे भाग आहे. मराठीमध्ये गझल हा काव्यप्रकार खऱ्या अर्थाने लोकप्रिय करणाऱ्या सुरेश भटांना आपला रंग कसा वेगळा आहे, हे त्यांचे त्यांनाच वेळोवेळी सांगावे लागले. त्यांच्या मते, 'समीक्षक नव्हेत, तर आपला हा महाराष्ट्र म्हणजेच आपल्या महाराष्ट्रातील सामान्य मराठी जनताच कवीचे सर्वोच्च न्यायालय असते.' ह्या न्यायानेच ह्या कवीने आपली ओळख आपणच करून दिली आणि रसिकांनीही वेगळ्या अंगाने ही ओळख ध्यानात ठेवली.

'गझल' हा मराठीतील समीक्षेच्या प्रांतातील वादग्रस्त पण रसिकांच्या दृष्टीने लोकप्रिय काव्यप्रकार. याचे कारण ह्या काव्य प्रकारास मराठीमध्ये मोठी परंपरा वा इतिहास नाही. परंतु ज्यांना नव्याने परंपरा निर्माण करायची असते, त्यांना आत्मविश्वासाने आपले म्हणणे ऐकणाऱ्यांपुढे मांडावे लागते. ज्ञानेश्वरदेखील याला अपवाद नाहीत. त्यामुळेच खुद्द ज्ञानेश्वरांनाही 'माझा



अनुक्रमणिका

मऱ्हाटाचि बोलु कौतुके। परि अमृतातेंही पैजा जिंके! ऐसी अक्षरे रसिके । मेळवीन' (ज्ञानेश्वरी अध्याय ६ ओवी क्र. १४) असे आपल्या श्रोत्यांना सांगावे लागले. याच पार्श्वभूमीवर सुरेश भट म्हणतात की, 'आपल्याच मायबोलीचे सामर्थ्य आम्हांला ठाऊक नसते, हे आमचेच करंटेपण आहे.' दुर्दैवाने मराठी समाजात हे करंटेपणे पूर्वीपासून आजतागायत चालत आले आहे. त्यामुळे ह्या भाषेत नव्याने काही करणाऱ्याला नेहमीच टीकेचा विषय व्हावे लागले आहे. गझल हा मूळ अरबी, फारसी काव्यप्रकार माधव जूलियनांनी मराठीत आणला. जूलियनांनंतर हा काव्यप्रकार मराठीत स्थिर करण्याचे श्रेय सुरेश भटांनाच दिले पाहिजे. इतके त्यांनी गझलला योगदान दिले आहे. 'रूपगंधा' (१९६१), 'रंग माझा वेगळा' (१९७०), 'एल्गार' (१९८३), 'झंझावात आणि सप्तरंग' (२००३) आणि अगदी अलीकडील बऱ्याचशा स्फुट गझल रचनेतून भटांनी आपले म्हणून एक विश्व रसिकांसमोर उभे केले आहे. हे विश्व उभे करताना त्यांचा एक अट्टहास आहे तो म्हणजे, 'मराठी गझलेला मराठी मातीचाच सुगंध आला पाहिजे. आपला मातृभाषेवर संपूर्ण ताबा आहे. त्याला कोणताही विषय किंवा कोणतीही भावना शिवीगाळ न करता तेवढ्याच प्रभावीपणे शेरातून व्यक्त करता येते.' त्यामुळेच मराठीतील विद्रोही कवितेला आपल्या आविष्कारासाठी जरी प्रक्षुब्ध भाषा स्वीकारावी लागली तरी गझलेने मात्र सौम्यता, सात्त्विकता आणि उदात्ततेचा दर्वळच मराठी रसिकांपुढे पसरवला आहे. म्हणूनच भट आपले आपल्या मराठी भाषेविषयीचे सामर्थ्य सांगताना रसिकांना म्हणतात की,

***'साय मी खातो मराठीच्या दुधाची***
***मी कुणाचा उंबरा झिजवू कशाला?'***

('एल्गार'– 'साय')

त्यांचे हे काव्यात्म उद्गार केवळ अहंपणाचे नाहीत, तर याचे प्रत्यंतर त्यांची एकूण गझल आस्वादताना येते. ह्या कवीचे भाषेवर विलक्षण प्रभुत्व आहे. 'रूपगंधा', 'रंग माझा वेगळा' आणि 'एल्गार' मधील बव्हंशी गझलांमध्ये आशयाची विविधता येते. ह्या कवितेत स्त्रीमनाची भावस्पंदने आहेत. प्रेयसीने दिलवराची केलेली आराधना आहे. शृंगारातील उत्कटता आहे. प्रियतमेची तळमळ आहे. कवीची जीवनाबद्दलची निराशा आहे. ही निराशा उदंड आहे आणि त्यातूनच दुनियेबद्दलची गैरमर्जीही आलेली आहे. बऱ्याच वेळा दुनियेबद्दलची बेफिकीरी ह्या कवितेत येते. त्याचप्रमाणे ही कविता सामाजिक विचारही मांडताना दिसते. त्यामुळे आरंभीचे प्रेम, भक्ती, स्त्रीसौंदर्य, शराब, खुदा एवढेच मर्यादित विषय ही गझल अभिव्यक्त करीत नाही.

जो खरा कवी असतो त्याचे लिहिणे हे त्याच्या जगण्यापेक्षा निश्चितच वेगळे असत नाही. त्याचे जगणेच त्याच्या लिहिण्यातून झिरपत असते. मग त्याच्या कवितेतून 'ती' बोलत असो अगर 'तो' बोलत असो, त्या बोलण्याला काहीतरी एक पार्श्वभूमी असते. संदर्भ



अनुक्रमणिका

असतो. काळाच्या दृष्टीने विचार करता मराठी कवितेमध्ये एका बाजूला ज्या काळात बोरकरांची इंद्रियनिष्ठ प्रेमकविता लिहिली जाऊन समीक्षकांनी ती शरीर स्वीकारणारी इंद्रियनिष्ठ प्रेमकविता म्हणून गौरविलेली होती, त्याच काळात भटांच्या कवितेतील प्रेयसी आपल्या दिलवराची आराधना करताना म्हणत होती.

*'मल्मली तारुण्य माझे तू पहाटे पांघरावे!*
*मोकळ्या केसात माझ्या तू जिवाला गुंतवावे!'*

('रूपगंधा'– 'रूपगंधा')

तिने तिच्या दिलवराला केलेल्या ह्या आराधनेत आहेत ती स्त्रीमनातील स्वाभाविक भावस्पंदने. ही प्रियतमा आपल्या दिलवराला हे जे आवाहन करते आहे त्या आवाहनामध्ये आव्हानात्मकताही आहे. परंतु ही आव्हानात्मकता व्यक्त होताना मात्र भाषेत सौम्यता आहे, संयमीपणा आहे, सात्त्विकता आहे आणि उदात्तताही आहे. त्यामुळे ह्या आवाहनाला आणि आव्हानाला एक प्रकारची नादमयता येते व संगीतही येते. ह्या आराधनेत एक प्रकारची शालीनता आहे. कारण ही आराधना आहे ती बऱ्याच काळच्या प्रतीक्षेनंतरची आराधना आहे. त्यामुळे प्रतीक्षेत जी रूक्षता अनुभवावी लागते आणि पचवावी लागते, ती रूक्षता तिने अनुभवलीही आहे आणि पचवलीही आहे, पण त्या रूक्षतेचा थोडाही लवलेश ह्या आराधनेत येत नाही आणि व्यक्तही होत नाही. तिच्यात आहे ती आव्हानात्मक नम्रता. त्यामुळे तिचे त्याला हे जरी भावनिक आव्हान असले तरी ते व्यक्त झाले आहे ते आवाहन म्हणूनच. ती लाजरी नाही, पण जरी लाजरी नसली तरी बेफिकीरही नाही. तिच्या ह्या आराधनेत येतात त्या नम्र सूचना. ह्या सूचनाही सूचकतेतून व्यक्त होतात. ती संकोचत नाही एवढी धाडसी आहे, पण बेदरकार मात्र नाही.

'मालवून टाक दीप', 'तरुण आहे रात्र अजुनी', 'पहाटे पहाटे', 'सजण दारी उभा', 'चांदण्यात फिरताना', 'भल्या पहाटे निघून आले', 'उजाडल्यावरी सख्या' अशा काही प्रेमविषयक गझलांमधून प्रेयसीचे मनोगत व्यक्त होत असताना ह्या साजणीच्या मनातील आपल्या साजणाविषयीचा उत्कट प्रेमभाव व्यक्त होतो. साहजिकच त्यात शृंगारातील उत्कटतादेखील येते.

*'मालवून टाक दीप चेतवून अंग अंग*
*राजसा किती दिसांत लाभला निवांत संग'*
('रंग माझा वेगळा'– मालवून टाक दीप)
ही नायिका काय? किंवा आपल्या दिलवराला–
*'तरुण आहे रात्र अजुनी राजसा निजलास का रे?*
*एवढ्यातच त्या कुशीवर तू असा वळलास का रे?'*
('रंग माझा वेगळा'– 'तरुण आहे रात्र, अजुनी')

थोड्याफार धाडसाने विचारणारी ती काय? ही नायिका आपल्या मनातील उत्कटता व्यक्त करीत असताना अद्यापही असणारी अतृप्तताही स्वाभाविकपणे व्यक्तं करून जाते. येथे ही साजणी जरी काहीशी आक्रमक वाटत असली आणि त्याच्याही पुढे पाऊल टाकणारी वाटत असली तरीही ती उच्छृंखल नसून सोज्वळ व सौजन्यशील आहे. तिची आक्रमकतादेखील सहज स्वाभाविक आहे. कारण बोलणारी ती आहे आणि ती बोलत असतानाही तिच्या ह्या आक्रमक आवाहनातही प्रीतीला शोभणारी लज्जेची कवचकुंडले तिने ल्यालेली आहेतच.

*'अजुनही विझल्या न गगनी तारकांच्या दीपमाला;*
*अजुन मी विझले कुठे रे? हाय! तू विझलास का रे?'*

('रंग माझा वेगळा'– 'तरुण आहे रात्र अजुनी')

ह्या तिच्या उद्गारात प्रतीकात्मकता आहे. तिने त्याला केलेले जे प्रश्न आहेत ते प्रश्नदेखील उत्तरगर्भ प्रश्न आहेत. जणू तिने विचारलेल्या त्या प्रश्नातच तिला अपेक्षित असणारे उत्तर सूचित केले आहे.

गझलमध्ये कवीला रचनातंत्र पाळावे लागत असल्यामुळे वृत्त आणि वृत्ती ह्या दोन्ही बाबी सांभाळत असताना कमालीची कसरत करावी लागते. वृत्त साधण्याच्या प्रयत्नात वृत्ती तर हरवता कामा नये आणि वृत्ती तर वृत्तात बसायला हवी. हे अवघड काम गझलकाराला करावे लागते. भटांनी आपल्या गझलेत आपली वृत्ती सांभाळली आहे. 'गझल हे केवळ वृत्त नसून ती एक वृत्ती आहे. एवढेच नव्हे, तर तिच्यात एक सूक्ष्म आणि सुंदर निवृत्तीही आहे. क्षणभर निवृत्त मनाने जगाकडे पाहता आल्याशिवाय खऱ्या प्रवृत्तीची गोडीच कळत नाही.' ही निवृत्ती भटांच्या कवितेत प्रकर्षाने आढळते. त्या भूमिकेतूनच कविमनातील भावना स्वत:च्या प्रेरणेनुसार स्वत:चा घाट शोधते. त्यामध्ये एक अंतर्गत लय येते. ताल येतो आणि सूरही गवसतो. या साम्याने कविमनातील भावना जिवंत होते आणि तिचा जेव्हा आपल्याला प्रत्यय येतो तेव्हा त्यातील अनुभव किती गहिरा आहे याची साक्ष पटते.

*'दुभंगून जाता जाता मी अभंग झालो!*
*चिराचिरा जुळला माझा; आत दंग झालो!'*

('रंग माझा वेगळा'– 'दुभंगून जाता जाता')

जणू काही कविमन आपला अनुभव व्यक्त करीत असताना रसिक मनाशी सहजसंवाद साधते. तेव्हा आपल्याला एका गोष्टीची प्रकर्षाने जाणीव होते ती म्हणजे ह्या कवीच्या भावकवितेचे भावनिक सौंदर्य हे कवीच्या मूळ व्यक्तिमत्त्वातच सामावलेले आहे. कवीचे व्यक्तिमत्त्व, रचनेचा कसदारपणा, लयीचे स्पंदन, शब्दांचे सौंदर्य ह्या साऱ्या बाबींचे मनोज्ञ मिश्रण येथे झालेले असल्यामुळेच ही कविता रसिकाला एकाच वेळी क्षुब्ध व लुब्ध करते. तप्त व तृप्त करते. व्याकूळ व उदात्त करते. आसक्त व विरक्तही करते.

*'रंगुनी रंगात साऱ्या रंग माझा वेगळा!*
*गुंतुनी गुंत्यात साऱ्या पाय माझा मोकळा!*

('रंग माझा वेगळा'– 'रंग माझा वेगळा')

असा आपला स्वानुभव कवी व्यक्त करीत असताना त्यातील भावसौंदर्याने आणि शब्दसौंदर्याने कविमनातील भावनिकतेचा एकजिनसी प्रत्यय रसिकाला येतो.

कधी कधी ही कविता भावानुभव व्यक्त करीत असताना कल्पिताचाही आधार घेते. तेव्हा कवीने केलेला परमनप्रवेश महत्त्वपूर्ण ठरतो. ह्या परमनप्रवेशातून कवीने कल्पिलेल्या कल्पित व्यक्तीचे मनही ह्या कवितेत अगदी हुबेहूब प्रकटते. त्या व्यक्तीच्या मनाची स्थितीगती तिच्या ताणाबाणासह आविष्कृत होऊन त्या व्यक्तीचे मन साजिवंत होते. स्वाभाविकपणे ह्या कवितेत नाट्यानुकूलता येते. संवाद जिवंत होतात. कवी अन्य कोणत्यातरी व्यक्तीच्या मुखातून बोलू लागतो तेव्हा तो जणू काही ती एक विशिष्ट भूमिका जगतो आहे असेच वाटत राहते. तेव्हा ही कविता एक प्रकारच्या उत्कटतेला पोहचते. तेव्हा ती एकाच वेळी व्यक्तिलक्षीही होते आणि आत्मलक्षीही होते. याचा प्रत्यय ह्या कवीच्या कित्येक कवितांमधून येतो.

*'मेंदीच्या पानांवर*
*मन अजून झुलतेऽग*
*जाईच्या पाकळ्यांस*
*दव अजून सलतेऽग'*

('रूपगंधा'– 'माहेरवाशीण')

*'आज गोकुळात रंग खेळतो हरी;*
*राधिके, जरा जपून जा तुझ्या घरी!'*

('रंग माझा वेगळा'– 'रंग खेळतो हरी')

*'मालवून टाक दीप चेतवून अंग अंग*
*राजसा किती दिसांत लाभला निवांत संग'*

('रंग माझा वेगळा'– 'मालवून टाक दीप')

*'तरुण आहे रात्र अजुनी राजसा निजलास का रे?*
*एवढ्यातच त्या कुशीवर तू असा वळलास का रे?'*

('रंग माझा वेगळा'– 'तरुण आहे रात्र अजुनी')

अशा कित्येक काव्यपंक्तींमधून कविमन अन्य कोणाच्या तरी मनातून बोलते तेव्हा कवीला दुसऱ्याच्या मनात किती सहजपणे शिरता आले आहे, याचे प्रत्यंतर येते. याचे कारण 'गझलेत नाट्याचा मोठा अंश असतो.' ह्या नाट्यांशामुळे 'काव्य असो की गाणे असो, त्यात बुद्धीच्या चपल आणि तल्लख विलासापेक्षा भावनेचा जिवंत जिव्हाळा हाच



अनुक्रमणिका

शेवटी आपल्या मनाला जाऊन भिडतो आणि नंतरही तिथे रेंगाळत राहतो.' यामुळेच ही कविता रसिकाच्या मनात एकसारखी रेंगाळत राहते.

'एल्गार' ह्या संग्रहातील भटांची बव्हंशी कविता आत्मलक्षी असून अत्यंत औपरोधिक शैलीची आहे. 'एल्गार' म्हणजे निकराचा हल्ला. हा निकराचा हल्ला भटांनी यशस्वी रीतीने केलेला आहे. जग बोलू देत नाही म्हणून कविमनाला आलेली जीवनाबद्दलची उदंड निराशा 'एल्गार'मधील बव्हंशी कवितेमधून व्यक्त झालेली आहे. संग्रहाच्या सुरुवातीच्याच 'एल्गार' ह्या गझलमध्ये कवीने औपरोधिक शैलीत आपल्या मनातील खंत व्यक्त केलेली आहे.

*'ओठी तुझ्या न आले अद्याप नाव माझे*
*अन् ओठ [illegible] माझा स्वभाव नाही'* ('एल्गार'-'एल्गार')

असे म्हणताना कवी कमालीच्या तिऱ्हाईतपणे दुनियेला आपला मोठेपणा सुनावताना दिसतो. मी माझी योग्यता असूनही कसा बाजूला पडलो आणि माझ्यापेक्षा खुजी माणसे कशी माझ्यापेक्षा उंच झाली हेच कवीला येथे व्यक्त करायचे आहे. गझलचे सामर्थ्य काय आहे हे समजावून न घेता गझलवर प्रस्थापितांनी वावगी टीकाच केली. तिची जशी समीक्षा व्हायला हवी होती तशी झाली नाही. साहजिकच ह्या कवीचे जेवढे कौतुक व्हायला हवे होते तेवढे झाले नाही. म्हणूनच हा कवी म्हणतो आहे की, तुझ्या ओठावर आजवर तरी माझे नाव आले नाही, पण काळजी करू नकोस. आपले नारे ऐकून व्यर्थ भावात जाणारा आणि भाव मारणारा मी मनुष्य नाही. कारण आता जमाना पुरता बदलला आहे. रामशास्त्र्यांसारखे न्यायप्रियदेखील आता गारद्यांमध्ये सामील होऊन पारधी झाले आहेत.

*'गर्दीत गारद्यांच्या सामील रामशास्त्री*
*मेल्याविना मढ्याला आता उपाव नाही'* ('एल्गार'-'एल्गार')

म्हणून अशा ह्या दुनियेला शाप देण्याचीदेखील कवीची इच्छा नाही. जग आपल्याला बोलू देत नाही याबद्दलची खंत पुन्हा 'आळंदी' ह्या गझलमध्ये दिसते. माझ्या ओठावर जरी स्वच्छंदी शब्द आले तरी हे स्वच्छंदी शब्द बोलण्याची जगाने मला बंदी केली आहे–

*'जरी ओठांवरी येती नभाचे शब्द स्वच्छंदी*
*मला बोलायची बंदी, तुला ऐकायची बंदी'* ('एल्गार'-'एल्गार')

आपल्यां कवितेची दखल न घेणाऱ्यांना भटांनी मारलेला हा टोमणाच आहे. माणसाचा मोठेपणा माणूस जिवंत असताना बव्हंशी मान्य होतच नाही. ज्ञानदेवांचे मोठेपणही ज्ञानदेव समाधिस्थ झाल्यावरच जगाने मान्य केले. आपलेदेखील असेच होणार आहे असे त्यांना वाटते.

*'इथे मागून ही माझी समाधी बांधली गेली*
*जिथे मी गाडला गेलो अरे ही तीच आळंदी!'* ('एल्गार'-'एल्गार')

इथे दिवाळी असते ती फक्त राजपुत्रांची आणि हे राजपुत्र तुमच्या-आमच्या रक्ताचे दिवे जाळून दिवाळ्या साजऱ्या करणारे, आनंदोत्सव करणारे आहेत, याची कवीला पुरेपूर

कल्पना आहे. आपल्यावरही हेच बेतले आहे ह्या भूमिकेतूनच कवीचे हे व्यक्त होणे आहे.

प्रेमविषयक गझलांमध्येही कवीजवळ बरेचसे अनुभवातून शहाणपण आलेले दिसते. आपल्या प्रेयसीच्या तेजोमयी जीवनात अर्थात वर्तमानकालीन जीवनात आपल्या भूतकालीन सावलीचा अंधार नको, हा शहाणपणा 'गीते' ह्या गझलमध्ये स्वाभाविकपणे व्यक्त होतो. तिचा संसार सुखाचा व्हावा म्हणूनच तो तिचा संसार सोडून आला आहे. एकेक ऋतू तिला मेंदी लावतो आहे. हरएक फुलाचा शृंगार तिच्यासाठीच आहे. पहाटेचे आकाश तिला आपल्या अंधारातून घेऊन गेले हे तसे बरेच झाले. कारण आपला अंधार तिच्यासाठी नव्हता. तो आपल्यासाठी होता. आपल्या वाट्याला आलेला नकार हा तिच्या भावी आयुष्याचा होकार होता. म्हणूनच तो म्हणतो,

> ***'कोदून गडे आणू आयुष्य नवे कोरे***
> ***देहात पुन्हा होती झंकार तुझ्यासाठी'*** ('एल्गार'-'गीते')

तिची त्याच्याकडून अपेक्षा होती ती नव्या कोऱ्या आयुष्याची. तिची ती अपेक्षा काही गैर होती असेही नाही. मात्र हे नवे कोरे आयुष्य आपल्याजवळ नाही याची प्रांजळ कबुली तो तिला देतो. तिचा ओला आषाढ जरी त्याच्या दारात आला तरी तो आता तिच्यासाठी मल्हार गाऊ शकणार नाही ही त्याची मर्यादा तो स्वाभाविकपणे मान्य करतो. त्याचा हा विचार शहाणपणाचा विचार आहे.

हा शहाणपणाचा विचार तो करतो आहे. कारण तिने नेमके त्याला टाळलेले आहे. म्हणूनच तो तिला म्हणतो की, तू नभातले तारे माळलेस आणि त्या वेळी तू माझ्या स्वप्नांना मात्र गाळलेस. आज माझ्याबद्दल तुझ्या डोळ्यात तू जरी पाणी आणलेस तरी त्याचा काही उपयोग नाही. माझी कविता जेव्हा मी तुझ्यावर लिहिली ती आज प्रसिद्ध झाली म्हणून इतरांबरोबर तूही वाचतेस. पण जेव्हा मी हे तुझ्यावर आणि तुझ्यासाठी लिहिले, तेव्हा मात्र तू माझे एक पानही वाचले नाहीस. माझ्या मिठीने तुला थोडासा प्रकाश मागितला पण तू मात्र माझ्या रात्री जाळल्यास. वसंताला तो फुलला नाही म्हणून तू नावे ठेवतेस, पण तू तरी तुझे फुलायचे वायदे पाळलेस का?

> ***'कालच्या वसंताला ठेवतेस का नावे?***
> ***वायदे फुलायाचे पाळलेस का तेव्हा?'*** ('एल्गार'-'ओठ')

तिने त्याला ऐनवेळी टाळले आहे याची तो तिला जाणीव करून देतो आहे.

> ***'चुंबिलास तू माझा शब्दशब्द एकांती;***
> ***ओठ नेमके माझे टाळलेस का तेव्हा?'*** ('एल्गार'-'ओठ')

यायचे तेव्हा ती आली नाही आणि नुसते यायचे बहाणे तेवढे केले. ते बहाणे त्याला कळले आहेत आणि म्हणूनच तो ह्या बहाण्यांमुळेच शहाणा झाला आहे. त्यामुळेच तो कोणताही थिल्लर विचार करताना दिसत नाही.



अनुक्रमणिका

व्यवहारात प्रीती हा शुद्ध मूर्खपणा कसा आहे, हे त्यांच्या 'अवेळ' ह्या गझलमधून दिसून येते. येथे कवी आपण प्रेमात पडलो याबद्दल दुसऱ्या-तिसऱ्या कोणाला दोष न देता स्वत:लाच दोषी ठरवतो. प्रीती करणे म्हणजे सावलीसाठी झुरणे आणि वाऱ्याच्या मागे लागणे हे त्याला कळून चुकले आहे.

*'मी कशी प्रीती कराया लागलो*
*सावलीसाठी झुराया लागलो'* ('एल्गार'-'अवेळ')

प्रेमात पडणे म्हणजे दुसरे-तिसरे काहीही नसून विषाचा पेला भरणे असते हेही त्याला पटले आहे. ह्या विषाचे नाव मात्र त्याच्या परिणामाशिवाय कळत नाही.

*'या विषाचे नाव सांगा कोणते?*
*मी पुन्हा पेला भराया लागलो!'* ('एल्गार'-'अवेळ')

ह्या कवीला जगाने नाना प्रकारे छळले आहे. मग ते प्रेयसीचे छळणे असो वा समाजाचे छळणे असो. समाजातील जातिभेदाबद्दल भटांना कमालीची चीड आहे. 'जानवी' ह्या गझलेत त्यांनी माणसामाणसात फरक करणाऱ्यांना आकाशखाजवे म्हटले आहे. हे आकाशखाजवे आपल्याच मस्तीत जानव्यांना गाठी देत असतात आणि दुसऱ्यांच्या आतड्याला पडणाऱ्या पिळाचे मात्र त्यांना काहीच वाटत नसते.

*'प्रत्येक आतड्याचा मी पीळ होत आहे*
*ते मात्र गाठ देती त्यांच्याच जानव्यांना'* ('एल्गार'-'जानवी')

आणि मग कवीला साहजिकच देवधर्म वगैरे सारे काही खोटे आहे याची जाणीव होते. मग जीवन म्हणजे शेवटी 'फुटका पेला' आहे याची खात्री त्याला पटते.

*'शेवटी वेदमंत्रांनी अन्याय एवढा केला*
*मशहूर ज्ञानया झाला... गोठ्यातच जगला हेला'*

('एल्गार'-'फुटका पेला')

रेड्याच्या कानफडात मारून रेड्याकडून वेद वदवून घेणारा ज्ञानया मशहूर झाला, पण ज्याने कानफडात खाऊन वेद म्हटले तो रेडा मात्र गोठ्यातच राहिला. या जगाचा न्यायच उलटा आहे.

*'घासते घरोघर भांडी स्वप्नांची राजकुमारी*
*वणवणतो पोटासाठी हा राजपुत्र अलबेला'* ('एल्गार'-'फुटका पेला')

अशा ह्या वातावरणात जर जगण्याचे मद्य घ्यायचे असेल तर त्यासाठी आपल्या रक्तात स्वत:च्या हृदयाचा 'फुटका पेला' विसळावा लागतो.

*'जर हवे मद्य जगण्याचे... जर हवी धुंद जन्माची*
*तू विसळ तुझ्या रक्ताने हृदयाचा फुटका पेला'*

('एल्गार'-'फुटका पेला')

जग हे असेच आहे, म्हणून स्वर्गात जावे म्हटले तरी स्वर्गाबद्दलही बरे ऐकायला मिळत नाही. 'आग' ह्या गझलेत कवी म्हणतो,

***'कालची बातमी खरी नाही***
***हाय, स्वर्गात भाकरी नाही'*** ('एल्गार'-'आग')

म्हणून त्याला देवदूताच्या पगाराची चौकशी करावी वाटते.

***'देवदूता तुझा पगार किती?***
***का मला सांग नोकरी नाही?'*** ('एल्गार'-'आग')

ह्या देशाप्रमाणेच स्वर्गातही बेकारी असावी अशी त्याला शंका येते आणि ह्या साऱ्यातून सुटायचे असेल तर–

***'आले रडू तरीही कोणी रडू नये***
***कोणीच आसवांच्या हाती पडू नये'*** ('एल्गार'-'नाते')

उगाच रडून आसवांच्या हाती पडण्यात काही अर्थ नाही. आपण जन्मच का घेतला हाच त्याच्यासमोर पडलेला प्रश्न आहे. म्हणून आयुष्यात काहीही घडू नये, कोणाशीही नाते जडू नये, असेच त्याला वाटते. कारण जितके नाते जास्त जडावे तितके जास्त रडावे लागणार. म्हणूनच तो म्हणतो,

***'इतकेच मला जाताना सरणावर कळले होते***
***मरणाने केली सुटका जगण्याने छळले होते'***

('एल्गार'-'आकाश उजळले होते')

यासाठी तो मेल्यावर ह्या जगाचे आभार मानतो.

***'मेल्यावरी जगाचे आभार मानले मी***
***जाऊ दिले मला हे उपकार मानले मी'*** ('एल्गार'-'आभार')

इतकी टोकाची भूमिका घेऊन दुनियेशी फारकत घेण्याशिवाय आता त्याला गत्यंतरच नाही. इतके दुनियेने त्याला छळले आहे. एकंदरीत ह्या कवीची दुनियेवर गैरमर्जी आहे. अर्थात ही गैरमर्जी असली तरीही कविमनातील उद्रेक व्यक्त करताना जरी कवी वैतागलेला असला तरी खऱ्या जगावरचे त्याचे प्रेम यत्किंचितही कमी झालेले नाही. म्हणून त्यांच्या काव्याचे स्फुरण एखाद्या वाहत्या झऱ्यासारखे वाटते.

**प्रा. सुहासकुमार बोबडे**
मराठी विभाग
महिला महाविद्यालय, कराड ४१५११०, निवास दूरभाष (०२१६४) २२२०९३

❑

# सम्राटाच्या निधनानंतर...

❑

**प्रदीप निफाडकर**

*गेलो निघून दूर पुन्हा आढळेन का?*
*माझा कराल शोध परी सापडेन का?*

–असे गात गात सुरेश भट नावाचा कविश्रेष्ठ, गझलसम्राट दूर निघून गेला. पुनर्जन्मावर तिळमात्र विश्वास नसतानाही 'आलो इथे चुकून पुन्हा मी चुकेन का?' असे ते म्हणाले होते. शोध केला तरी ते सापडणार नाहीत आणि चुकूनही येणार नाहीत, हे एकदा स्पष्ट झाल्यावर जो तो उठून काहीही सांगू लागला आहे. त्यांनी तेही ओळखून–

*काही भलतेच लोक मागुन करतील शोक,*
*पण त्यांच्या आसवात मी कधीच नसणारच*

असे म्हटले होते, पण सुरेश भट यांच्या साहित्याचे मूल्यमापन खऱ्या अर्थाने मराठी समीक्षेने केले नाही, हे त्रिवार सत्य आहे. आज जवळपास ५७ वर्षे जो कवितांचे विविध प्रकार हाताळतो, ज्याला दैवाने व्यथा दिली, त्याला केवळ उपेक्षाच देण्याचे काम मराठी साहित्यिक-समीक्षकांनी का करावे हे कोडे आहे. भट काव्यलेखन करू लागले तेच मुळी १९४६ च्या दरम्यान. तत्पूर्वी त्यांनी लिहिलेल्या कवितांचे बाड एका विहिरीत टाकले गेले. जाणीवपूर्वक लेखनाची १५ वर्षे उलटल्यावर त्यांचे पहिले पुस्तक 'रूपगंधा' निघाले. मग १९७४ ला 'रंग माझा वेगळा', ८३ ला 'एल्गार', ९४ ला 'झंझावात' आणि गेल्या वर्षी (२००२) 'सप्तरंग'. भटांची काव्यभरारी पाहता जगाने नीट जगू दिले असते, तर त्यांनी याहूनही अधिकाधिक सुंदर गीते, हृदयस्पर्शी गझला दिल्या असत्या, पण ते... त्यांनी हिंदीतही गझला लिहिल्या, पण मराठी वैभवातच गझलेची भर घालण्याचेच कार्य त्यांनी ठरवून केले. एखाद्या मिशनऱ्याप्रमाणे जीव लावून, जान ओतून, आयुष्य जाळून केले. शिवाय ते करताना एक पिढीच्या पिढी तयार केली. मराठी साहित्यिक-समीक्षकांनी त्याला 'भटारखाना' म्हटले, 'मठ' म्हटले तरी त्यांनी पर्वा केली नाही. ते मिजाशीत नव्हे, कैफात जगत होते. मठ म्हणून ज्यांनी त्यांना उपेक्षिले-हिणविले, त्यांना आपल्या कोतेपणाची पूर्ण

जाणीव होती. म्हणून ते घाबरत होते. भटांचे बोलणे, वागणे, खाणे असा कोणताही विषय त्यांनी निषिद्ध मानला नाही, पण भट त्यांना कळले नाहीत, हेच खरे. खरे तर भटांनी मराठी रसिकतेला व्यापक केले. नवनवीन प्रतिमा दिल्या. 'ओठापुनी'सारखे जुने शब्द वापरतानाच 'तरंग', 'चाहूल', 'मल्मली', 'रेशीम' या शब्दांना नवा वर्ख चढविला, पण केवळ टीकेमुळे सर्वांनी याकडे दुर्लभ केले. वास्तविक भट यांची प्रतिमा, त्यांची रूपके याचा अभ्यास होणे गरजेचे आहे.

***हा असा चंद्र, अशी रात, फिरायासाठी***
***तूच नाहीस इथे हात धरायासाठी***

अशी गझल लिहिल्यानंतर १२-१५ वर्षांनी 'झंझावात' मध्ये ते पुन्हा–

***रात्र होती, चंद्र होता, चांदणे होते***
***मात्र माझे एकट्याचे हिंडणे होते***

असे लिहितात, पण गझलेच्या नव्हे स्वत:च्या ओळींच्याही प्रेमात पडायची ही त्यांची सवय जुनी होती. उदाहरणच द्यायचे तर 'रूपगंधा' संग्रहातले देता येईल.

***जेव्हा माझे दुःख ऐकवितो मैफलीत***
***नेहमीच तेव्हा नभ झुरते एका कळीत***

असे म्हणणारे भट नेहमीच या कवितेत पुन्हा–

***जेव्हा होऊन मस्त गातो मी मैफलीत***
***नेहमीच तेव्हा नभ झुलते एका कळीत***

म्हणतात. यावर एकदा त्यांना छेडले असता त्यांनी सरळ सांगितले, "मी कल्पनेच्या प्रेमात पडलो." ही निष्पाप निरागसता कोणत्या कवीत आहे? 'ललित' मासिकाच्या १९८८ मध्ये निघालेल्या रौप्यमहोत्सवी अंकात त्यांची मी मुलाखत घेऊन विचारले होते, "तुमच्या कवितेत 'जगण्याशी भांडत' असलेला निराशावादच का डोकावतो? तेव्हा ते म्हणाले होते, "तो वास्तवाचा वेध आहे, जगण्याचा अंतिम निष्कर्ष नाही." आणि त्यांनी एक शेर ऐकविला–

***गमे-दुनिया को गमे-इश्क में शामिल कर लो***
***नश्शा बढता है शराबें जो शराबों में मिले***

(तुमच्या जीवनासक्तीच्या दु:खात जगाचे दु:ख मिसळा. नशा चढतेच!) त्यांनी अनेकांचे दु:ख आपले मानले. त्यातून काही कविता जन्मल्या (उदा. झंझावात-तळहातावरचा फोड') अनेकांना त्यांनी उभे केले, उभारी दिली. त्यांनी जाहीर दिलेल्या पैशापेक्षा चुपचाप दिलेले पैसे मोजले तर मराठीतल्या एकाही कवीने-साहित्यिकाने एवढे दान केलेले नाही, हे लक्षात येईल. त्यातून 'अजून आसवे किती पुसायचीच राहिली' सारख्या ओळी जन्मल्या. भटांचे वागणे व लिहिणे वेगळे करता येणार नाही. कारण त्यांचे वागणे जितके निर्मळ, गोटीबंद तेवढेच लिहिणे होते. अशी महाराष्ट्रातली एकही शाळा नाही की जिथे 'आज गोकुळात रंग

खेळतो हरी' या गाण्यावर स्नेहसंमेलनात नाच झाला नाही, अशी एकही माहेरवाशीण नाही की जिला 'मेंदीच्या पानावर' म्हटल्यावाचून राहवले नाही, असा एकही तरुण नाही की ज्याने 'हे तुझे अशावेळी लाजणे बरे नाही' अशी गोड तक्रार केली नाही, असा मुस्लिम नाही की ज्याने 'खऱ्यात माझा खरा मोहंमद' म्हटले नाही, असा ख्रिस्ती नाही की ज्याने 'अमुचा प्रेमळ प्यारा येशू' म्हटले नाही, असे बुद्धाचे लेकरू नाही की ज्याने 'भीमराया घे तुलाही लेकराची वंदना' म्हटले नाही. एवढा जनमानसात, खोल खोल अंतरात शिरणारा हा गझलसम्राट, कविश्रेष्ठ आहे, त्याची नीट समीक्षा व्हायला हवी. मराठीच्या भल्यासाठी ते करावे लागेल. भटांमध्ये तेव्हाही फरक पडला नव्हता, आताही पडणार नाही.

*आता व्यथेपल्याड उभा दूरदूर मी*
*डोळे तिथे पुसाल– इथे मी ढळेन का?*

**प्रदीप निफाडकर**
फ्लॅट क्रमांक ३, 'प्रथमेश विहार', आनंदनगर, सिंहगड रस्ता,
पुणे– ४११ ०५३.

❑

---

## स्वागत

**सातबारा,** नारायण सुमंत, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृ. ४८
**तुझ्या दाराहून जाता,** प्रकाश घोडके, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृ. ३६
**हिरवा गारवा,** प्रतिभा भट, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृ. १२६
**परतीचा गाव,** जीवन आनंदगांवकर, लोकमान्य मुद्रणालय, पृ. ६१
**दत्तो वामन पोतदार,** शुभलक्ष्मी पोतदार, लीनता प्रकाशन, पुणे, पृ. ३१२
**विवेक आणि न्याय,** मे. पुं. रेगे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृ. २३२
**आस्वाद आणि आलेख,** वि. शं. चौघुले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृ. २०३
**समग्रलेखक बाबुराव बागुल,** कल्पा किरवले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृ. १९९
**भारतीय साहित्याची संकल्पना,** संपा. द. दि. पुंडे/पद्मजा घोरपडे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृ. ३५२
**शिंपले आणि मोती,** खलील जिब्रान, सिद्धांत प्रकाशन, नाशिक, पृ. १०४
**तिने दिलेले फूल,** सदानंद डबीर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृ. ६८
**अनाहत,** देवकी वळवडे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृ. १६८
**वास्तव,** योगिनी वेंगुर्लेकर, श्रीसमर्थ साई वितरण, पुणे, पृ. ३२

# गौरी देशपांडे यांचे कादंबरीलेखन

❑

**प्रा. अरुण देवरे**

विस्तृत जीवनानुभव पेलणारा गद्य साहित्यप्रकार म्हणजेच कादंबरी. जीवनसमांतर असा साहित्यप्रकार म्हणजेच 'कादंबरी...' कारण जीवनाची लय कादंबरीतून प्रतिबिंबित होत असते.

१९६० नंतरच्या मराठी कादंबरीकारांमध्ये गौरी देशपांडे उदयास आल्या. त्यांनी कथा, दीर्घकथा, कादंबरी, ललित निबंध हे साहित्यप्रकार यशस्वीपणे हाताळले आहेत.

'एकेक पान गळावया', 'तेरुओ', 'निरगाठी', 'दुस्तर हा घाट', 'गोफ', 'उत्खनन' या त्यांच्या गाजलेल्या लघुकादंबऱ्या अथवा कादंबरिका आहेत. गौरी देशपांडे यांनी मोजक्याच कादंबऱ्या लिहिल्या, पण कादंबरीकार गौरी देशपांडे अशी वेगळी नाममुद्रा त्यांनी मराठी कादंबरी–विश्वात निर्माण केली आहे.

'दुस्तर हा घाट' आणि 'थांग' (१९८७), 'निरगाठी', 'चंद्रिके गं... सारिके गं', (१९८९), 'गोफ' (१९९९), 'मुक्काम' (१९९९), 'उत्खनन' (२००२) या त्यांच्या पृथगात्म कादंबऱ्या आहेत.

त्यांच्या कादंबऱ्यांतून आधुनिक स्त्रीचे प्रतिबिंब पडलेले आहे. व्यक्तीव्यक्तींमधील संबंधांना त्या प्राधान्य देतात. उदाहरणार्थ– 'दुस्तर हा घाट' या कादंबरीतील वनमाळी, ज्येष्ठ प्राध्यापक भाई आणि त्यांची हुशार विद्यार्थिनी नमू, 'थांग' मधील नायिका कालिंदी, तिचा पती नंदन, नंदनचा सहकारी इयन आणि नंदनच्या कामामधील वरिष्ठ, 'निरगाठी'त व्यवसायाने फोटोग्राफर असलेला नायिकेचा पती यजू... नायिकेच्या मुली अमृता (मिमी) आणि शामिली (शमी), फॅमिली डॉक्टर अभि, नायिकेच्या बहिणी रंजू-जानकी, नायिकेचा मेहुणा सृजन भटनागर, नायिकेच्या बहिणीची मुले (बिजोबा/विजू, वीरेंद्र/विरू), मित्रपरिवारामधील जपानी पती-पत्नी ('योशियो-हिसायो, तोशी-ओजिसान), नायिकेचा मित्र (डिक), 'चंद्रिके गं... सारिके गं' मधील नायिका सुहास-सुहासिनी, सुहासिनीचे आई-वडील, आई-काका,



अनुक्रमणिका

सुहासिनीचा भाऊ 'दादा', सुहासिनीचे शेजारी, तात्या, काशीमावशीची मुले, नायिकेची मैत्रीण मालविका, मालविकेचा पती सुधीर, त्यांची जुळी मुले जय आणि यश, दादाची पत्नी 'मोना', संस्थानिक विक्रम (सरकार), सुहासिनीच्या गावातील घरामधील भाडेकरू पॉल, अमेरिकेत डॉक्टरेट करीत असतानाचा मित्र 'जेरेमी, जेरेमीचा भाऊ डॉक्टर मिचेल, सुहासिनीचे पीएचडीचे गाईड 'स्टुअर्ट', 'गोफ' मधील सुलक्षणची आई (माँ...), वसुमती (सुलक्षणची पत्नी), सुलक्षण (वसुमतीचा नवरा आणि माँचा मुलगा), इन्स्पेक्टर आनंदा (माँचा मानलेला भाऊ), आदित्य (सुलक्षण, वसुमतीचा चिरंजीव), गडीमाणसे (संजा, युवराज, यमुना)...

'मुक्काम'मधील कालिंदी, नंदन, दिमित्री, अंकल फारुख तसेच 'उत्खनन'मधील दुनिया, तिचा जीवनसाथी डॉ. दयाळ, मुलगी मणी, मैत्रीण अभया, दुनियेच्या मैत्रिणी अर्णव, तीर्थंकर आणि सती अशा नानाविध आणि विविधरंगी व्यक्ती-व्यक्तींचे नातेसंदर्भ तपासण्याचा आणि आकळण्याचा यशस्वी प्रयत्न गौरी देशपांडे करतात.

गौरी देशपांडे यांच्या कादंबरीची कथानकेदेखील विशेषत्वाने नजरेत भरतात. 'दुस्तर हा घाट' या कादंबरीत अनाथ, हुशार, बी. ए. ची स्टार विद्यार्थिनी नमू, ज्येष्ठ प्राध्यापक भाई, त्यांचा मुलगा वनमाळी आणि त्याचा मित्र ऑलिस्टर यांची ही कथा सुटसुटीत कथानकातून साकारते. भाईंची स्टार विद्यार्थिनी वनमाळीशी विवाहबद्ध होते. त्याचा मित्र ऑलिस्टरही तिचा मित्र बनतो. भटकंती, पाश्चात्त्य संगीताची आवड आदी उपक्रम सुरू असताना तिला वनमाळीने नसबंदी केल्याचे कळते. त्याचा निषेध म्हणून ती त्याच्याबरोबरची भटकंती टाळते. त्यानंतर पदव्युत्तर शिक्षण घेते आणि शेक्सपियरच तिला आधार देतो. असं आणि इतकंच कथानक या कादंबरीला लाभलं आहे.

'निरगाठी'त नायिका व मिमी (आईचा द्वेष करणारी मोठी मुलगी), मोठ्या बहिणीसारखेच वर्तन असणारी, पण हट्टी आणि दुराग्रही अशी दुसरी मुलगी 'शमी' यांचे संबंध चित्रीकरणापासून कथानकास आरंभ होतो. नायिका आणि तिचा दुसरा नवरा संयुक्तपणे आत्महत्या करतात. असे आटोपशीर परंतु गुंतागुंतीचे (आरंभ आणि शेवट नायिका आणि तिचा पती यांच्या मृत्यूतूनच येतो. आगेमागे घडलेल्या घटना दाखवून) कथानक साकारते.

'चंद्रिके गं... सारिके गं...!' मध्ये 'सुहास (सुहासिनी) आणि मालविका या दोन मैत्रिणींच्या शालेय जीवनापासूनच्या मैत्रीपासून कथानकाला आरंभ होतो आणि कादंबरीची अखेर झिजत झिजत मालविकाच्या मृत्यूशी होते. मालविकाच्या मृत्यूने सुहासिनी मानसिकदृष्ट्या कोसळून जाण्याचे कथानक येते.

'गोफ' मधून माँ आणि वसुमती या दोन्ही करारी स्त्रिया पतिविरहाच्या दुःखाला सामोऱ्या जातात. नात्यांचा, भावभावनांचा, कुटुंबासाठी घेतलेल्या अथक परिश्रमांचा आणि सासू-सुनेच्या भावसेतूचा गोफ विणला आहे.

'उत्खनन' मधून 'दुनिया' या नायिकेने आपलाच गतआयुष्याचा इतिहासपट मांडलेला

आहे. दुनियेच्या जीवनात अनंता आणि डॉ. दयाळ असे दोन पुरुष येतात. अनंतापासून दुनियाला मणी नावाची मुलगी होते. बापू आणि अंक्लेसारिया हे दुनियाचे आधारस्तंभच आहेत. डॉ. दयाळ दुनियेस आपली पत्नी मानतो आणि अनंताची मुलगी मणी चा वत्सल बापही होतो. अकस्मात ब्रेनट्यूमरने त्रस्त असणाऱ्या अनंताचे पत्र येते आणि दुनिया त्याला आश्रय देते. सगळ्या घराला नवी पालवी फुटते. अशीच आणि इतकीच अनेकरंगी कथानके या लघुकादंबऱ्यांना लाभली आहेत.

गौरी देशपांडे यांच्या लघुकादंबऱ्यांतून निवेदनपद्धतीतसुद्धा वैविध्य जाणवते. 'थांग'चा आरंभच तृतीय पुरुषी निवेदनातून होतो. तो असा : "विलेम: हडकुळा. विरळ सोनेरी केसांचा. तोंडात सतत सिगरेट बाळगणारा... रने: भरगच्च छातीची... जंगली कबूतर...! कुठच्याही गोष्टीला पापण्या फडकावीत "खरं...?" असे म्हणते... इयन: लांबच्या लांब आणि सडपातळ. चेहऱ्याच्या हाडांवर कातडी ताणून बसवलेली. आंगेलिकी मात्र अतिशय सुरेख आहे. ग्रीक पुतळ्यासारखी. त्याचप्रमाणे 'निरगाठी' मधल्या पत्रांमधून निवेदनाचे वेगळेपण गौरी देशपांडे उपयोगात आणतात. मिमी-शमी यांच्या पत्ररूपातून कादंबरीला सुरुवात होते. फ्लॅशबॅक आणि भाष्य याकरिताही त्या वेगळी बांधणी करतात. हा नावीन्यपूर्ण प्रयोग त्यांनी या कादंबरिकेत योजला आहे.

ओघवती भाषा हा देशपांडे यांच्या भाषेचा स्वभावधर्म आहे. 'गोफ' मधून आगेमागे होऊन गेलेले प्रसंग छानपैकी ओघवत्या भाषेतून गुंफले जातात. 'उत्खनन' मधूनही त्याचे प्रत्यंतर येते.

भाषेच्या संदर्भात विचार करताना स्वगतांचा योग्य आणि अचूक वापर 'गोफ' मधून येतो. कमी शब्दांत भरपूर आशय भरण्यातूनच त्यांच्या लघुकादंबऱ्यांना प्रवाहित्व लाभते.

त्यांच्या कादंबरिकांच्या भाषेतील आशय, मांडणीतील सुलभता 'दुस्तर हा घाट' मधून आढळते. तसेच चालीरीती, रिवाज, परंपरा, प्रवासस्थळे 'थांग' मधील परदेश आकर्षणाचे द्योतक ठरतात.

प्रत्ययकारी वर्णने हा देखील त्यांचा भाषाविशेष आपल्याला जाणवतो तो असा : "दिमित्री हसत म्हणाला, "इतकं उत्तम अन्न आणि इतकी छान सोबत. मी इथून हलण्याची काहीच शक्यता नाही. तुम्ही करा आपला किती दंगा करायचा तो..." (थांग, पृष्ठ ११३) पात्रांचे स्वभावचित्रण या वर्णनातून अप्रतिमरीत्या व्यक्त होते.

**प्रा. अरुण देवरे**
एव्हरेस्ट, डी/५, ५१०., गोल्डन पार्क, नेतुरकर वाडा,
कल्याण (पश्चिम) ४२१३०१., जि. ठाणे.

# मराठी साहित्यातील गोमन्तकी बोली

❑

डॉ. विद्या प्रभुदेसाई

प्रादेशिकतेच्या पार्श्वभूमीवर तयार झालेल्या सर्वच मराठी साहित्यामध्ये प्रामुख्याने त्या प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या बोलींचा उपयोग वातावरणनिर्मितीसाठी केलेला दिसतो. किंबहुना साहित्यिकाची प्रादेशिक संवेदनशीलता त्या त्या बोलीतूनच अधिक प्रभावीपणे प्रकट होते. गोमंतकीय लेखकांच्या मराठी साहित्यातही गोमंतकीय संवेदनशीलता साहित्यात केलेल्या गोमंतकी बोलीच्या वापरामुळे अधिक प्रभावीपणे प्रकट झाली आहे.

प्राचीन मराठी वाङ्मयातील भाषिक रूपांचा विचार केल्यास त्या वाङ्मयात आज गोमंतकी बोलीत प्रचलित असलेली अनेक भाषिक रूपे आढळतात. ज्ञानेश्वरी, लीळाचरित्र, दृष्टान्तपाठ या ग्रंथांमध्ये आजच्या गोमंतकी बोलीतील किती तरी शब्द आणि व्याकरणिक रूपे विखुरलेली दिसतात. उदक, उंडी, आफविले, हुरपणे असे आजच्या मराठीमधून विस्मृत झालेले शब्द गोमंतकी बोलीत सर्रास वापरतात.

यादव काळात महानुभाव, नाथ आणि भक्ती संप्रदायाची जी प्रचंड सांप्रदायिक आंदोलने महाराष्ट्रभर झाली, त्याचे लोण गोव्यातही पोहोचले. इतकेच नव्हे, तर गोव्यात या आंदोलनांनी मूळ धरले असे म्हटल्यास वावगे ठरू नये. गोव्यातील पारंपरिक लोकगीतांतही नाथ, विठ्ठल आदि दैवतांचे उल्लेख येतात. तसे पाहता पूर्वीपासून गोव्यात मराठी ही लिखाणाची तसेच धार्मिक व सांस्कृतिक व्यवहाराची भाषा असली तरी कोकणी ही सामाजिक व्यवहाराची भाषा होती. या दोन्ही भाषांचे स्वभाव आणि तोंडवळे भिन्न असले तरी त्यांच्यात निकटचे वांशिक नाते असल्यामुळे त्यांची भाषिक देवाण-घेवाण करणे सहज शक्य असलेले दिसते. त्यामुळेच गोमंतकात उपलब्ध असलेल्या पहिल्या मराठी ताम्रपटापासून ते आजच्या साठोत्तरी साहित्यातही आजच्या गोमंतकी बोलीत वापरले जाणारे शब्द, वाक्प्रचार, म्हणी, खास गोमंतकी लकबी यांचा आढळ होतो. मराठी साहित्यात आढळणारे गोमंतकी बोलीचे वैशिष्ट्यपूर्ण रूप म्हणून या शैलीकडे पाहता येते.

गेली सातशे वर्षे गोमंतकाने मराठी भाषेची आणि साहित्याची निष्ठेने सेवा केली. त्यातूनच गोमंतकात निर्माण होणाऱ्या साहित्याने आपले असे खास भाषिक वळणही निर्माण

केल्याचे चित्र दिसते. इ. स. १५३९ आणि इ. स. १५५२ मधील ताम्रपट गोमंतकात सापडले. त्यांपैकी इ. स. १५५२ मधील ताम्रपटातील अभंग नंद भाषेतील असून त्या काळातल्या महाराष्ट्रातील व्यापारी वर्गाची ती सांकेतिक भाषा होती. नामदेव, तुकाराम यांनी काही अभंग त्याच भाषेत लिहिल्याचा उल्लेख सापडतो. गोमंतकातील म्हापसा शहरातील व्यापारी आपापसातील व्यवहारासाठी आजही या भाषेचा वापर करतात. 'गोमन्त शारदा' या गोमंतकीय कवींच्या काव्यसंकलनाचे संपादक रामदास प्रभू यांनी आपल्या संपादकीयामध्ये वरील विषय मांडला आहे.

गोमंतकातील उपलब्ध साहित्यापैकी कृष्णदास शामा याचा 'श्रीकृष्णचरित्रकथा' हा ग्रंथ पहिला ग्रंथ मानला जातो. आदिलशहाच्या राजवटीखाली असलेल्या गोमंतक प्रदेशात निर्माण झालेला हा ग्रंथ इतिहासाचार्य पिसुर्लेकर यांना इ. स. १९२४ मध्ये पोर्तुगालमधील ब्राग येथील ग्रंथालयात सापडला. कृष्णदासशामानंतर ज्ञानदेव, नामदेव, निवृत्ती या गोमंतकीय कवींनी गोमंतकातील कृष्णदासशामाची संतपरंपरा पुढे चालविली. 'द्रोणपर्व', 'योगवासिष्ठ', 'निवृत्तेश्वरी' इत्यादी ग्रंथ त्यांच्या नावावर आहेत. गोमंतकीय संतकवींनी निर्माण केलेल्या या साहित्यात आजच्या गोमंतकी बोलीत वापरले जाणारे अनेक शब्द आणि रूपे आढळतात. उदा. 'आगा' हे संबोधन ज्ञानेश्वरीप्रमाणेच इतर प्राचीन वाङ्मयातही येते. गोमंतकी बोलीत एका विशिष्ट प्रकारच्या संबोधनासाठी आजही 'आगा' हे संबोधन वापरले जाते. तसेच 'उत्तर' म्हणजे वचन. गोमंतकी बोलीत 'उत्तर दिवप' म्हणजे वचन देणे असा अर्थ होतो. 'म्हणे चाणौरा वीरा, तुवां बोलिलेसी सब्द उतर' अशी ओळ श्रीकृष्णचरित्रकथेत आढळते. तसेच 'टाळी पेटिजे' यामध्ये पिटणे या क्रियापदाचे पेटणे असे रूप आले आहे. गोमंतकी बोलीत 'टाळ्यों पेटल्यो' असेच म्हणतात. याशिवाय फुडां, (पुढे), भवंडिला (फिरविला), मंचूक (व्यासपीठ– माची), आंबुले (विशिष्ट प्रकारची कर्णफुले), गुंडे (दगड), फाले (फाल्या– उद्या) असे अनेक शब्द आणि शाब्दिक रूपे आढळतात.

सोळाव्या शतकातील मिशनरी साहित्यातही गोमंतकी बोलीतील वैशिष्ट्यपूर्ण शब्द आढळतात. पिवन (पिऊन), आंग (अंग), काति (चामडी), हातरुण (अंथरूण), घाय (घाव), निमाणी (शेवटची), विसाव घेई (विश्रांती घेतो) या आणि अशा कित्येक शब्दांचा वापर या साहित्यात केलेला दिसतो. याच साहित्यात 'पिसडुनि' सारखे खास वेगळीच संवेदनशीलता घेऊन येणारे शब्द आढळतात. 'पिसडुनी' हा शब्द गोमंतकी बोलीत आढळतो. मराठीतील 'कुस्करणे' या शब्दाच्या अर्थाला जवळ जाणारा परंतु कुस्करणेपेक्षा थोडी वेगळी संवेदनशीलता घेऊन येणारा हा शब्द आहे.

प्राचीन काव्याप्रमाणेच एकोणिसाव्या शतकातील गोमंतकीय मराठी साहित्यातही अशी अनेक भाषिक स्थळे दाखविता येतात. नायिकेच्या शृंगाराचे वर्णन करताना 'आंबाड्यावरुनी **केतकी हात**' अशी रचना यशवंतराव सूर्याराव सरदेसाई आपल्या कवितेत करतात. यातील 'केतकी हात' हा शब्द गोमंतकी बोलीतून आला आहे. मराठीमध्ये 'केतकीची पात' असा

प्रयोग असून या पातीला गोमंतकी बोलीत 'हातो' असे म्हणतात. तसेच त्यांच्या **'चंवरती रुख** नव्या मोहरे' या ओळींमध्ये आलेले 'रुखू' आणि 'चंवर' हे दोन्ही शब्द गोमंतकी बोलीतील आहेत. (चंवर म्हणजे बहर आणि रुख म्हणजे झाड). याच काळातील वि. का. प्रियोळकर यांनी 'देमांद माहात्म्य' हे विडंबनात्मक खंडकाव्य लिहिले. मराठीतील हे पहिले विडंबनकाव्य होय. या काव्याचे शीर्षकच पोर्तुगीजमधून घेतलेल्या 'देमांद' या शब्दाने बनते. देमांद म्हणजे कोर्टकचेरीतील खटला. याशिवाय केतुली (केवढी), रेंद (बागायतीचा व्यापार), प्रेस (किंमत), सांक (पोते), वालो (पंचा), पोवन (गिनीसोन्याचे नाणे), फाल्त (कमी), पावणी (लिलाव) या शब्दांबरोबरच पादेसेस (अडचणीत), पासांजेर (प्रवासी), तावेर्न (दारूचा गुत्ता), केशार (तक्रार), पोस्त (पोलीसचौकी), सोलिसितादोर. (सॉलिसिटर), रेजिदोर (रजिस्ट्रार), आदव्होगाद (ॲडव्होकेट) असे पोर्तुगीजमधून गोमंतकी बोलीत आलेले शब्दही या काव्यात आले आहेत.

आधुनिक मराठी कवितेत बा. भ. बोरकर यांनी एकूणच मराठी कवितेवर आपल्या काव्याचा ठसा उमटविला. ह्यांच्या मराठी कवितेत गोमंतकीय संवेदनशीलता व्यक्त करणाऱ्या गोमंतकी बोलीतील कितीतरी शाब्दिक रूपांचा शोध घेता येतो. 'गितार' हे बोरकरांच्या एका काव्यसंग्रहाचे शीर्षकही गोमंतकी बोलीतच आहे. 'गिटार' हा इंग्रजीतील तत्सम शब्द पोर्तुगीज प्रभावामुळे गितार असा गोमंतकी बोलीत उच्चारतात. याशिवाय 'वेलीस वाळच्या या पाचवाच म्हैना' अशा ओळी त्यांच्या 'अनुरागिणी'मधील 'अंगणातले ऐश्वर्य' या कवितेत येतात. याच कवितेत पुढे 'धा, गा तुम्ही ही सारे या कोकिळांप्रमाणे' अशी ओळ येते.

वाळ– ही गोमंतकात होणारी वेलपालेभाजी. तिला काही ठिकाणी 'मायळु' असे म्हणतात.

धा– धादोस या गोमंतकी बोलीतील शब्दाचा अर्थ मन आनंदाने भरून येणे असा आहे.

'आग लागल्यागत राळांचा फाग खेळती राने' या ओळीतील फाग हा सारीपाटासारखा असणारा खेळ. जुन्या काळी गोमंतकात हा खेळ प्रसिद्ध होता. 'झडली पानेदेखील होती अमृतभरले दोणे' या ओळीतील दोणे हा शब्द पानांपासून तयार केलेल्या द्रोणासाठी वापरला जातो.

गोमंतकात होणाऱ्या भाज्यांमध्ये दोडकी, भोपळा या भाज्या महत्त्वाच्या आहेत. गोमंतकी बोलीत दोडकी (शिरांची) या भाजीला घोसाळी हा शब्द वापरला जातो. गोमंतकात ही घोसाळी दोन प्रकारची असतात. एक वेल घोसाळी तर दुसरी माही घोसाळी. गणेश चतुर्थीला आराशीसाठी तयार केलेल्या 'माटोळीला' ही खास बांधतात. तसेच दुधीभोपळा आणि लाल भोपळा यांना गोमंतकी बोलीत अनुक्रमे 'कोंकण दुधी' आणि 'दुधी' असे म्हणतात. बोरकरांच्या कवितेत या भाज्यांचे उल्लेख अनेक ठिकाणी येतात. उदा. 'सोन्याचा क्षण टिपला **घोसाळी दुधिणींनी**'.

बोरकरांच्या 'जादुगिरी' या कवितेत अशाच खास गोमंतकीय असलेल्या 'चिकनळी' या



अनुक्रमणिका

खेळाचा उल्लेख येतो. चिकनळी– ही एक पोकळ बांबूची नळी असून त्यात एक दट्टा असतो. गोमंतकात होणारी तिरफळे त्यात घालून दट्टा दाबला म्हणजे नळीतील तिरफळे दूर फेकली जाऊन समोरच्या वस्तूंवर फट्दिशी बसतात. पूर्वीच्या काळी सुखवस्तू गोमंतकीयांचा (प्रामुख्याने भाटकार) हा मनोरंजनाचा खेळ होता.

'**चिकनळीत** ठासून **तिर्फळे** काढित होतो बार
दचकुनि होती उडत पाखरें हवेत वारंवार'

तसेच पिसोळी म्हणजे फुलपाखरू. बोरकरांच्या कवितेत

'हिरव्या पिवळ्या **पिसोळ्यांचा** थवा तेवढा बघतो' अशी ओळ येते.

सवा– हा शब्दही खास गोमंतकीय संवेदनशीलता घेऊन येतो. प्रत्यक्ष विवाह झाल्यानंतर नवरा-नवरी मजलसीच्या वेळी (रिसेप्शनच्या वेळी) ज्या ठिकाणी बसतात ती जागा. 'बोहला', 'वेदी' यापेक्षा वेगळी अर्थच्छटा घेऊन येणारा हा गोमंतकी बोलीतील शब्द बोरकरांच्या 'नाते' या कवितेत येतो.

कामेरी आणि वावराडी हे दोन गोमंतकी बोलीतील शब्द बोरकरांप्रमाणेच अनेकांच्या साहित्यात येतात. या दोन्हींचा स्थूल अर्थ काम करणारे मजूर असा असला तरी सूक्ष्मत: या शब्दाचे अर्थ वेगवेगळे आहेत.

**कामेरी–** दिवसाच्या पगारावर म्हणजेच दिसावड्यावर काम करणारा मजूर.

**वावराडी–** प्रामुख्याने कायमस्वरूपी म्हणजेच महिन्यामहिन्याला पगार घेणारा मजूर.

वरील दोन्ही शब्द वेगवेगळ्या संदर्भात मराठी साहित्यात आलेले दिसतात. 'खपणारे वावराडी त्यांच्या विसाव्याच्या विड्या.

**पोई–** सुपारीच्या झाडाच्या पानांचा पुढचा भाग. आज हस्तकारागीर याच पोईपासून विविध प्रकारची भांडी, पिशव्या बनवितात. प्लॅस्टिकला पर्यायी म्हणून या पोईंचा वापर करता येऊ शकतो. गोव्यात या पोईंत घेऊन मासळी साफ करण्याची व कामेरी वावराडी यांना जेवण देण्याची पद्धत होती.

'पोईनल्या मासळीचा स्वाद घेत साथ साथ'

(माइने घर; चित्रवीणा)

गोमंतकी बोलीत 'गेल्या' हा षष्ठीचा प्रत्यय लागून आमगेल्या (आमच्या), तुमगेल्या (तुमच्या), तांगेल्या, हांगेल्या अशी रूपे होतात.

'**शेवागेल्या** भंडाऱ्याचे कुणबाऊ प्रीतीचे गाणे' या ओळीत शेवा नावाच्या कुणब्याने म्हटलेले गाणे असा अर्थ घेता येतो.

शेती, बागायती यांविषयीही अनेक शब्द बोरकरांच्या कवितेत आले आहेत. उदा.

**कुळागर–** या शब्दाचा मूळ अर्थ कुळांनी राबविलेले आगर असा घेता येतो. आगर म्हणजे पाण्याचा साठा जवळ असलेली बाग. रूढार्थाने कुळागर म्हणजे सुपाऱ्यांची (माडी) बाग असा अर्थ होतो. यामध्ये प्रमुखत: सुपारी, गकेळी, मिरी अशा पाण्याच्या ओलाव्याने

होणाऱ्या झाडांची लागवड केलेली असते.

**भाट—** नारळाच्या बागांना भाट असे म्हणतात.

**पाट—** कालवे.

**कंवाथा—** नारळाला अंकुरवून तो थोडासा वाढला म्हणजे ह्याची लागवड केली जाते. पूर्ण वाढ झालेल्या या नारळाच्या झाडाला माड म्हणतात, तर तो छोटा असताना त्याला कंवाथा म्हणतात.

**पोफळे—** सालासकट सुपाऱ्या. 'पाटात पोफळे वाहतात नारिंगी.'

**करले—** शिसवी लाकडापासून बनविलेली एक वस्तू. पाटातून वाहणारे पाणी या करल्यांने बागात शिंपले जाते.

बागायतीप्रमाणे शेतीविषयक अनेक शब्द मराठी साहित्यात येतात.

**लुवणी—** तयार भाताची रोपे पुन्हा जमिनीत रोवणे.

'सरली नडणी, आज खांचरी लुवणी मळणी सुरू' अशी ओळ बोरकरांच्या कवितेत येते.

**ओवळ—** ओवळ हे गोमंतकाप्रमाणेच कोंकणपट्टीत फुलणारे वैशिष्ट्यपूर्ण फूल. 'गळ्यात गुंतवित ओवळसरांची माळा' असे बोरकर एका कवितेत म्हणतात.

**काजुले—** काजवे, **जोगुल—** विजांचे चमकणे.

बोरकरांच्या कवितेमध्ये वरील दोन्ही शब्द अनेक कवितांत आढळतात.

'काजुल्याची झाडें झेलित हाती' किंवा

'जोगुल जागल्या जळांच्या पात्री' अशा ओळी त्यांच्या कवितांमध्ये येतात

धुवांधार, उटंगार म्हणजे मुसळधार (पाऊस).

बावणे– कोमेजणे, उज्वाड– उजेड

वीख– विष, लासणे– जाळणे, भाजणे.

असे कितीतरी गोमंतकी बोलीतील शब्द बोरकरांप्रमाणेच शंकर रामाणींच्या कवितेतही आले आहेत.

चूड– मशाल. गोमंतक आणि एकूण कोकणपट्टीत माडाच्या वाळलेल्या झावळ्यांपासून मशाल बनविली जाते. रानात शिकारीसाठी वा रात्रौच्यावेळी गावात फिरण्यासाठी याचा विजेरीसारखाही उपयोग करतात. या भागातील लोकांची अशी समजूत आहे की रात्रौच्यावेळीं वाठारी (परिसराचा क्षेत्रपाळ) ही चूड घेऊन गावात फिरतो आणि गावाची राखण करतो. मराठी साहित्यात बोरकर, रामाणी, रायकर यांच्या कवितांप्रमाणेच वि. स. सुखठणकर, लक्ष्मणराव सरदेसाई, महादेवशास्त्री जोशी यांच्या कथांमध्येही हा शब्द येतो.

वेंगून राहणे– मिठी मारून राहणे.

राऊळात सारे अंधाराचे दीप

वेंगून राहिले मला माझे पाप ('पाप'– 'आभाळवाटा'– शंकर रामाणी)

**अस्कड**— काट्याकुट्यांनी, नको असलेल्या वनस्पतींनी भरलेली जागा.

'आता अस्कडशा वाटे, चिंब निनादते रान'

झाड वाजते मनात– ('गर्भागार' शंकर रामाणी.)

सहजपणे गोव्याच्या मातीचा वास घेऊन येणारी कविता म्हणून गजानन रायकरांच्या कवितांकडेही पाहता येते.

'कुळागिरी या घड केळीचे शिपटी पोफळीची.' घड, शिपटी हे शब्द खास गोमंतकातील बागायतीशी संबंधित आहेत. सुपाऱ्यांच्या घोसाला **शिपटी** असे म्हणतात. 'दायज', 'निजाचा' हे दोन शब्द खास गोमंतकीय संवेदनशीलता घेऊन येताना दिसतात.

**दायज**— रूढार्थाने दायज म्हणजे परंपरा असे म्हटले जात असले तरी या शब्दांमधून थोडीशी मर्यादित अर्थच्छटा अनुभवाला येते. प्रामुख्याने सांस्कृतिक परंपरेला दायज असे गोमंतकी बोलीत म्हणतात.

**निज**— या शब्दाचा अर्थ स्वत:चा असा असला तरी गोमंतकी बोलीत 'निजाचो' या शब्दांमधून गोमंतकाची अस्मिता व्यक्त होताना दिसते. 'आमी निजाचे गोंयकार आसा' असा उल्लेख गोमंतकीय करतात. त्यामुळे निजाचा या शब्दाचा अर्थ केवळ सोईसाठी 'अस्सल' किंवा 'मूळ' असा घेता येतो.

'दायज घेऊनि तयांचे चाललो अग्नीतूनी

मी निजाचा गावडा रे गावगाड्याचा धनी'

अशा ओळी गजानन रायकरांच्या 'माझा गोमंतक' या कवितेत येतात.

'मेघदूत' या बोरकरांच्या अनुवादात्मक दीर्घकाव्याच्या प्रास्ताविक लेखनात वसंत बापट यांनी 'कवितेच्या प्रासादिक स्वरूपात असे बोलीतील शब्द खड्यांसारखे वाटतात' असे म्हटले आहे. 'कांबळे कितीही सुंदर असले तरी रेशमी दुकूलावर कांबळ्याचे पुंजके शोभत नाहीत' असेही या प्रास्ताविकात ते म्हणतात. वास्तविक कवीला आपली तरल संवेदना पकडण्यासाठी त्याच्या अंतर्मनातून येणारे बोलच अधिक समर्पक असतात. कवीच्या संवेदनशीलतेला तेच अधिक योग्य न्याय देऊ शकतात. म्हणूनच बऱ्याच वेळा साहित्यातील बोलीचा अर्थ लावताना समानार्थी दुसरा शब्द दिला तरी तो अर्थ रसिकाला साहित्यिकाच्या अस्सल संवेदनशीलतेपर्यंत नेऊ शकेलच असे नाही. उदा. 'मेघदूत'च्या शेवटच्या पानावर या काव्यात आलेले गोमंतकी बोलीतील शब्दांचे अर्थ दिले आहेत. एक सोय म्हणून हे ठीक असले तरी त्या अर्थांमधून कवीच्या अस्सल संवेदनशीलतेपर्यंत कितपत पोहोचता येईल हा प्रश्नच आहे. उदा. त्यामध्ये 'पाज' आणि 'वय' हे दोन्ही शब्द त्यांच्या दिलेल्या अर्थांमधून योग्य तऱ्हेने रसिकापर्यंत पोहोचू शकणार नाहीत.

**पाज** या शब्दाचा अर्थ अरुंद जिना असा दिला आहे आणि

**वय**— म्हणजे कुंपण असा अर्थ दिला आहे. तसे पाहता हे दोन्ही अर्थ अतिव्याप्त आहेत. गोमंतकी बोलीत 'पाज' आणि 'वय' हे दोन्ही शब्द दैनंदिन व्यवहारात नेहमीच

वापरले जातात. ज्या ठिकाणी कृत्रिम तयार केलेल्या पायऱ्या नसून नैसर्गिकरीत्या तयार झालेल्या अरुंद खाचा खाचा असतात, चढाव चढण्यासाठी त्याचा जिन्यासारखा उपयोग करतात, त्याला 'पाज' म्हणतात. गोमंतकीय बोलीत पोर्तुगीजमधून आलेला 'इस्काद' हा शब्द जिन्यासाठी वापरतात. तसेच वेगवेगळ्या झाडांच्या खुंटांनी परिसराला बांधून घेतलेली मर्यादा म्हणजे 'वय'. बहुधा या वईच्या खुंटांपासून पुन्हा झाडे तयार होतात. प्रामुख्याने ही गुरांपासून परसातील झाडांचे रक्षण करण्याकरिता बांधली जाते. झाडांचे आडवे उभे खुंट सुंभाने गच्च बांधून ही वय तयार केली जाते. वईप्रमाणेच गोमंतक व कोकणपट्टीत 'गडगा' हा शब्दप्रयोग केला जातो. गडगा हा मातीने दगड एकमेकांवर गच्च रचून केला जातो.

'कोराटीच्या सुबक वइचा, ताटवा माधवीचा ।' अशी ओळ बोरकरांच्या 'मेघदूत'मध्ये येते.

कवितेतील संवेदनशीलता ही अधिक तरल असल्यामुळेच ती व्यक्त होताना नकळतपणे कवीच्या अनुभूतीशी प्रामाणिक असाच शब्द काव्यात येतो. कवितेप्रमाणेच कथा-कादंबऱ्यांमध्येही अस्सल गोमंतकीय संवेदनशीलता व्यक्त करणारी गोमंतकीय बोलीतील शाब्दिक व व्याकरणिक रूपे आढळतात. प्रामुख्याने कथा-कादंबऱ्यांमध्ये गोमंतकी बोलीत मिसळून गेलेल्या अशा कित्येक पोर्तुगीज शब्दांचा आणि वाक्यांचा आढळ होतो.

वि. स. सुखठणकर, लक्ष्मणराव सरदेसाई, पं. महादेवशास्त्री जोशी, बा. द. सातोस्कर यांच्या कथांमधून गोमंतकीय बोलीचा वापर भरपूर केलेला दिसतो. पाटी, सूप, रोवळी या खास कोकणात बनविल्या जाणाऱ्या वस्तू. वास्तविक बांबूपासून बनविलेल्या या वस्तूंना आकारमानानुसार वेगवेगळी नावे आहेत.

**पाटली–** मध्यम आकाराची, ज्याला तोपली असेही म्हणतात.

**पाटलो–** आकारमानाने छोटी, ज्याला 'नोपलो' म्हणतात.

**फाटे–** मोठ्या आकाराची पाटी.

तसेच **सूप–** हे मध्यम आकाराचे असून **सुपली** ही आकाराने छोटी असते.

**रोवळी–** बांबूच्या बनविलेल्या या वस्तूत तांदूळ धुण्याची पद्धत आहे. वेळून केल्या जाणाऱ्या भाताचे तांदूळ रोवळीत धुऊन ठेवण्याची गोव्यात आणि कोकणात पद्धत आहे.

**भिरंड–** कोकमफळ. काजू-फणसाप्रमाणे भिरंड हे खास कोकणातील फळ असून त्याच्या बियांपासून भिरंडेल नावाचे तेल बनवितात. हे अत्यंत महाग असून त्याचा औषधासाठी उपयोग होतो. या भिरंड फळाचा बाहेरचा भाग म्हणजेच आमसोल. नारळाचा रस घालून केलेल्या पातळ पदार्थाला सोलकढी तर रसाशिवाय केलेल्या पातळ पदार्थाला 'तिवळ' असे गोमंतकी बोलीत म्हणतात. गोमंतकी कथा-कादंबऱ्यांमध्ये या दोन्ही प्रकारच्या कढींचे उल्लेख अनेक वेळा येतात.

**वाठारी–** गावात रात्रीच्या वेळी फिरून गावाची राखण करणारा राखणदार असा या शब्दाचा अर्थ आहे. वाठार या गोमंतकी बोलीतील शब्दाचा अर्थ परिसर असा आहे. परिसरात फिरणाऱ्या अस्सल नागालाही वाठारी असे म्हणतात.



अनुक्रमणिका

**दवरणे**– 'दवरणे आणि क्रॉस' नावाची कथा मनोहर हिरबा सरदेसाई यांनी लिहिली आहे. गोमंतकी बोलीत 'दवरप' ठेवणे असा अर्थ असून त्यावरूनच दवरणे हा शब्द बनला आहे. गोमंतकात पूर्वी एका गावाहून दुसऱ्या गावात सामान पाटीत घालून नेत असत. अशा वेळी दमलेल्या प्रवाशाने सामानाचे फाटे (मोठी पाटी) ठेवून विश्रांती घ्यावी म्हणून गावागावात ठरावीक अंतरावर एक विशिष्ट आकाराचा दगड ठेवलेला असे. साधारणत: एक पुरुष उंचीचे थोडेसे उतरते असे हे दगड आजही गोमंतकात अनेक ठिकाणी आहेत. या दगडाला गोमंतकात 'दवरणे' असे म्हणतात.

**खळे**– सारवलेले अंगण असा 'खळे' या शब्दाचा अर्थ सामान्यत: कोकणात घेतला जातो. परंतु गोमंतकी बोलीत या शब्दाला वैशिष्ट्यपूर्ण अर्थ प्राप्त झाला आहे. दरवाजासमोरच्या अंगणाला गोमंतकी बोलीत 'आंगण' असे म्हणतात. शेतात मळणी, झोडपणी इत्यादी शेतीची कामे करण्यासाठी जे अंगण तयार केले जाते त्याला 'खळे' म्हणतात.

**माटव**– मंडप असा अर्थ घेतला जातो. परंतु गोमंतकी बोलीत तसेच संपूर्ण कोकणपट्टीत माटव म्हणजे विशिष्ट प्रकारे तयार केलेला मंडप असा अर्थ आहे. हा मंडप खास बांबू, माडाची आणि पोफळीची लाकडे, झावळ्या यांनी तयार केलेला असतो. अशा मंडपालाच गोमंतकी बोलीत 'माटव' म्हणतात. गोमंतकीय कथांमध्ये वरील सर्व वैशिष्ट्यपूर्ण शब्द येतात.

'गोव्याकडची माणसं' मध्ये गोव्यातील वैशिष्ट्यपूर्ण माणसे लक्ष्मणराव सरदेसाई यांनी रेखाटली आहेत. ही व्यक्तिचित्रे रेखाटताना लेखकाने अपरिहार्यपणे गोमंतकी बोलीचा वापर केला आहे. 'गोंयचो भगत' या व्यक्तिचित्रात आलेला **'आशेभगत'** हा शब्द गोमंतकी बोलीत येतो. आशाळभूतपणे एखाद्या गोष्टीसाठी घिरट्या घालणाऱ्याला आशेभगत म्हणतात.

**होलायता**– जागृत ठेवतो. प्रसाद लावणे– कौल घेणे.

**निवेद आनी अबशेक**– नैवेद्य आणि अभिषेक.

**अष्टिदेगेचो जोडो**– करवतकाठाची चांगली धोतरजोडी

**खांकनवाळ**– गरीब –तुमी अगदीच खांकनवाळ असला तर कोंबडीच्या पिलावरही देव तृप्त होतो.

**माड्या**– अळूच्या कांद्यापासून तयार झालेला मोठा नळीसारखा कंद. गोमंतकात या कंदाच्या काचऱ्या (गोमंतकात त्याला फोडी म्हणतात) करतात.

**हातोड**– कुळागराच्या वरचे माळरान. पाण्याशिवाय उत्पन्न देणारे काजू, फणस, बांबूची, कळकाची बेटे या हातोडावर (माळरानावर) असतात.

**रेंदेर**– माडावर चढून माडाची दारू (सूर– नीरा) काढणारा.

**कांतार**– गोमंतकी बोलीतील विशिष्ट प्रकारची गाणी. विशेषत: माडावर चढून सूर (दारू) काढताना रेंदेर ही गाणी म्हणतो.

**उंडे**– एक प्रकारचा पाव. पोर्तुगीजांनी गोव्यात आणला. भट्टीत कडक भाजलेले छोटे

छोटे पाव म्हणजे उंडे. काही वेळा पावाच्या या पिठात सूरही घातली जाते. आजही बहुतेक गोवेकरांची सकाळ पोदेराच्या (दरवाज्यात पाव घेऊन येणाऱ्या पाववाल्याच्या) उंड्यांनी होते. पोर्तुगीजकालीन उंड्यांची चव आजच्या उंड्यांना नाही, हे प्रत्येक गोवेकर मान्य करतो आणि म्हणूनच 'ते फिरंगीय गेले आनी ते उंडेय गेले' असे म्हटले जाते.

**हांतासूक सोदप—** गिळंकृत करण्याची इच्छा करणे.

**होगाचे—** स्थानिक

'बामण उपरे गावकार होगाचे. मूळचो गाव तुजो. ठिकाण तुजे विठू शेणे ते हातासूंक सोदता' (देमांदिस्त)

**माळुंड—** एक प्रकारचा बिनविषारी साप. गोमंतकात हा सरपटणारा प्राणी बागात, कुळागरात, कधी कधी घरातही सापडतो. हा अत्यंत आळशी असून तो थंडाव्याच्या ठिकाणी नुसता पडून असतो. निरुपद्रवीही असतो. गोमंतकात आळशी माणसाला माळंडासारखा म्हणतात.

**धाम—** रोगाची साथ.

गोमंतकीय कथेप्रमाणेच कादंबऱ्यांमध्ये वापरलेली गोमंतकीय बोलीही वैशिष्ट्यपूर्ण अशीच आहे. सुभाष भेंडे यांची 'आमचें गोंय आमका जाय' ही मराठी कादंबरी शीर्षकच गोमंतकी बोलीतून घेऊन येते. अलीकडेच या कादंबरीची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली. परंतु, 'आमचा गोवा आम्हांला पाहिजे' असे शीर्षक या कादंबरीला देण्यात आले. पहिल्या आवृत्तीतील शीर्षकाचे वजन दुसऱ्या आवृत्तीला येत नाही. सुभाष भेंडेंच्या 'उद्ध्वस्त', 'जोगीण', 'चकवा' या कादंबऱ्यासुद्धा गोमंतकीय जीवनावर आधारलेल्या असल्याने अनेक ठिकाणी गोमंतकी बोलीतील शाब्दिक तसेच व्याकरणिक रूपे आली आहेत. 'गोवा' ही इंद्रायणी सावकार यांची कादंबरी ही पूर्णतया गोमंतकीयांच्या कृती-उक्ती उलगडून दाखविते. 'सलोमीचं नृत्य' ही हेबळेकराची गोमंतकाच्या सांस्कृतिक संदर्भावर आधारलेली, तर 'गोवा माझा सुखाचा' ही लँबर्ट मास्कोरन्हान्स यांची प्र. श्री. नेरुरकर यांनी अनुवादित केलेली कादंबरी गोमंतकातील ख्रिस्ती समाज आणि निर्वसनावर आधारित आहे. 'नागडा'– वि. ज. बोरकर, 'मांडवी तू पेटलीस'– काकोडकर, 'मांडवी तू आटलीस!' ही लक्ष्मणराव सरदेसाई यांची तर 'मेनका' ही बा. द. सातोस्कर यांची कादंबरीही गोमंतकीय संवेदनशीलता घेऊन येते. ज्ञानेश्वर कोलवेकरांच्या 'प्रश्नचिन्ह', 'डेस्परेट' या कादंबऱ्यांमध्येही गोमंतकी बोलीचा वापर केला आहे. या प्रत्येक कादंबरीतील शब्द वेगळे वेगळे न घेता सर्व कादंबऱ्यांमध्ये येणाऱ्या गोमंतकीय शब्दांचा विचार एकत्रच करणे योग्य ठरेल.

**फोगोटी—** फटाका      **हुमण—** मासळीची आमटी

**काजार—** ख्रिस्ती लग्न      **रस—** शाकाहारी आमटी.

**उडदा मेथी—** हा गोमंतकीय जेवणातील कालवणासाठी केलेला पदार्थ. हा आंबाडे, कैरी इत्यादींपासून शाकाहारी जेवणात केला जातो. तसाच कर्ली, कोलंबी, बांगडा इत्यादी

माशांपासूनही हा पदार्थ बनविला जातो.

**तिसऱ्यांचे डांगर, कोलंबीचे डांगर—** कोलंबी, तिसऱ्यांपासून बनविलेला भज्यासारखा पदार्थ.

**मनगणे—** चण्याच्या डाळीपासून बनविलेली खीर.

**खतखते—** सर्व भाज्यांपासून बनविलेला पदार्थ.

या कादंबऱ्यांमध्ये गोमंतकी बोलीतील उद्गारवाचक रूपेही आली आहेत.

**हय सायबा! ना सायबा!** (होय महाराजा...)

**किते गो—** काय ग!

**आवय मेल्लो—** आईविना

**एकेतरेचो—** एककल्ली-विक्षिप्त इत्यादी.

गोमंतकीयांच्या श्रद्धाशील वृत्तीतून निर्माण झालेले अनेक शब्द या कादंबऱ्यांत येतात.

**सांगणे करणे—** नवस बोलणे.

**गाऱ्हाणे—** गोमंतकी बोलीत वैशिष्ट्यपूर्ण अशी खास गाऱ्हाण्यांची लकब असते.

'पाव माज्या माणाच्या गुरु वर्सा पुर्सा— जाग्या देवचारा— परिवर्म्या— ही लेकरां तुजी सेवा करुंक आयल्यात तांची सेवा गोड मानून घे. पैशाक पाच पैशे मेळो, एवजिल्ली कामा साध्य करून दी— बरे कर सायबा!' (उद्ध्वस्त) गोमंतकी बोलीत 'सायबा' हा शब्द महाराजा या अर्थाने वापरतात. मूळ पुरुषाला गाऱ्हाणे घालताना 'माझ्या मानाच्या श्रेष्ठ पुरुषा, तुझी कृपा असू दे (तू पाव)' असे म्हणून पुढे त्या परिसरातील देवचार (पाशवी शक्ती), परिवर्म्या (कुटुंबातील वा परिसरातील मृत व्यक्ती यांना उद्देशून) यांना हे सांगणे केले आहे. तुझ्या लेकरांनी केलेली सेवा गोड मानून घे— त्यांची आर्थिक भरभराट होऊ दे. —मनोकामना (येवजिल्ली कामा) पूर्ण कर असे सांगून शेवटी 'बरे कर सायबा' असा या गाऱ्हाण्याचा समारोप करण्याची पद्धती आहे.

**धाजो—** या गोमंतकीय लोकोत्सवाच्या वेळी घातले जाणारे गाऱ्हाणे वेगळ्या प्रकारचे असते. हा उत्सव ज्या अंगणातल्या तुळशीपुढे होतो त्याला 'मांड' असे म्हणतात. तुळस, धर्तरीमाय, देव-देवचार, भुतां, खेता, म्हाक यांना दिलेले आमंत्रण 'गोवा', 'उद्ध्वस्त' या कादंबऱ्यांमध्ये येते.

'नवात्र पौर्णिमा' हाही एक गोमंतकातील लोकोत्सव. कोजागिरीच्या रात्री चोरपावलांनी लक्ष्मी येते आणि जो झोपला असेल त्याचे घर टाळून जाते, असा समज गोमंतकीय समाजात आहे आणि म्हणूनच या रात्री न झोपता शेतात तयार झालेल्या भाताचे पोहे, पायस (तांदळाची खीर), दूध खाऊन रात्रभर गाणी म्हटली जातात. नव-अन्न नवीन तयार झालेल्या भाताचा संदर्भ या शब्दाला आहे आणि म्हणूनच गोमंतकातील शेतकरी हा उत्सव साजरा करतात. शेणाने स्वच्छ सावलेल्या खळ्यात म्हटल्या जाणाऱ्या गाण्यांना 'अजाब' असे म्हणतात.

'गोवा' या कादंबरीत ही अजाबे दिली आहेत.

या अजाबाप्रमाणेच कांतारा हा गोमंतकीय गीत प्रकार लक्ष्मणराव सरदेसायांच्या 'मांडवी तू आटलीस!', हेबळेकरांच्या 'सलोमीचं नृत्य' यांमध्ये येतात.

दुडू कित्या मोडलो दुडू काजाराक मोडलो ('सलोमीचं नृत्य') दुडू- पैसे, काजार- ख्रिस्ती लग्न.

सुभाष भेंड्याच्या 'जोगीण'मध्ये काही प्रेमगीतेही गोमंतकी बोलीत आली आहेत.

काळीज गेले म्हजे रे उडून

यो रे मोगा चोय रे म्हाका

किंवा

पिटी पिटी पिटी काळीज म्हजे उड्रा

म्हाका तुजो दिसरात उग्डास येता.

या प्रेमगीताप्रमाणेच आणखीही काही गोमंतकी बोलीतील शब्द या कादंबरीत येतात.

**मोगा**– प्रेमिका **गोपान**– मिठीत

**काळीज**– हृदय **रोडता**– रडता

**उग्डास**– आठवण **चोय**– पाहा इत्यादी.

'वाफर' हा शब्द गोमंतकीय कादंबऱ्यांत वारंवार येतो. दोन गावांना जोडणाऱ्या नदीतून प्रवास करण्यासाठी वापरले जाणारे वाहतुकीचे साधन. (फेरीबोट)

**पांयण**– दोन्ही बाजूंनी कठडे असलेली पायवाट.

**कुर्पादोर**– विशिष्ट प्रकारचे दगड **तोर**– कैरी

**फातोर**– दगड

'आंब्याच्या झाडाला तोरा आली की हे कुपांदोराचे फातोर गावात यायला सुरू' ('प्रश्नचिन्ह'– ज्ञानेश्वर कोलवेकर). भेंड्यांच्या 'चकवा'मध्येही तोर हा शब्द आला आहे.

**चॅपेल**– छोटे चर्च. यालाच कपेल असेही म्हणतात.

**इंगर्ज**– मोठे चर्च.

यांच्या परिसरात भरणाऱ्या उत्सवाला फेस्त, फाम असे म्हणतात.

'पाल्मातोरी' आणि 'काव्हालमारिंज्यू'– विशिष्ट प्रकारचे जनावराच्या चामडीपासून तयार केलेले चाबूक'. बहुतेक सर्वच कथा-कादंबऱ्यांमध्ये पोर्तुगीजांच्या दडपशाहीचे वर्णन करताना वरील शब्दांचा वापर केला आहे.

**बल्कांव**– गोमंतकीय गृहरचनेमध्ये बल्कांव म्हणजे ओसरीवरील सिमेंटचे सोपे. शिळोप्याच्या गप्पा मारण्यासाठी उपयुक्त अशी ही बल्कांव परंपरा पोर्तुगीजांकडूनच आली.

**साल**– माजघर **दोल्तेर**– डोलणारी खुर्ची

**व्हल्तेर**– आरामखुर्ची

या शब्दांप्रमाणेच आडवे बामण (शैव), उभे बामण (वैष्णव), भटबामण- पुरोहित असे जातिजातीतील वैशिष्ट्यपूर्ण भेदही या कादंबऱ्यांमध्ये आले आहेत.

**भाटकार–** बागायतीचा मालक.

**पात्रांव–** मालक

याप्रमाणेच कलावंत समाजाशी संबंधितही काही शब्द या साहित्यात येतात.

**शेंस भरणे–** देवाला वाहण्यासाठी केला जाणारा विधी. नारळाशी लग्न लावून हा विधी केला जाई.

**हातलावणी–** कलावंतिणीवर भाटकाराचा हक्क प्रस्थापित करण्यासाठी वयात येताच तिला विकत घेणे.

**ओझं–** वोझे. गणेश चतुर्थीला खाण्याच्या पदार्थाप्रमाणेच फटाके तसेच चतुर्थीसाठी आवश्यक भाजी, फळे लग्न झालेल्या मुलीच्या घरी पाठविण्याची पद्धत गोव्यात आहे, त्याला ओझं म्हणतात. ही मुलगी म्हातारी झाली तरी तिला आईच्या घरून हे ओझे येते.

गोमंतकीय कथा-कादंबऱ्यांमध्ये येणारे पोर्तुगीज अधिकारी गव्हर्नर यांच्या तोंडी प्रामुख्याने पोर्तुगीज भाषाच घातली आहे.

**फाज फाव्होर द सेंतार (प्लीज बसा.)**

**ओब्रिगादु–** धन्यवाद

**सिंयोर–** महाशय

**आदेऊश–** गुड बाय. वि. ज. बोरकरांच्या कादंबरिकेचे शीर्षक 'आदेऊश' असे आहे. पोर्तुगीज अधिकारी गोमंतकीय बोलीत बोलताना वेगळेच उच्चार करीत असत. बोलीतील असेही काही नमुने या



अनुक्रमणिका

कादंबऱ्यांत आले आहेत.

ख चा उच्चार फ आणि फ चा उच्चार ह असा सामान्यत: ते करतात.

फोरे सांग तुजो चेडो फुंइं आसा?

**खरे–** खंय (कुठे)

तुका फोबोर नां (खबर) (ऑनरेबल हजबंड– गणाधीश खांडेपारकर)

गोपाळकृष्ण भोबे यांच्या 'मासे आणि मी' या ग्रंथात माशांचे आणि त्यापासून बनविल्या जाणाऱ्या पदार्थांचे उल्लेख आले आहेत. त्यातील बहुतेक शब्दांचे अर्थ त्यांनी कंसात दिले आहेत.

गोमंतकीय मराठी साहित्यातील गोमंतकी बोलीचा अभ्यास हा विषय इतका विस्तृत आहे की छोट्याशा जागेत या विषयाला हवा तसा न्याय देणे शक्य नाही.

विशिष्ट प्रदेशातील समाजसंस्कृतीकडून त्या प्रदेशातील बोलीभाषेचे पोषण होत असते. निवेदन प्रमाण भाषेत करून साहित्यात संवादासाठी स्थानिक बोलीचा वापर केला जातो. परंतु काही वेळा निवेदनातही स्थानिक संवेदनशीलता पकडता न आल्यामुळेच त्या त्या ठिकाणी अपरिहार्यपणे स्थानिक बोलीतील शब्द व रूपे येतात.

गोमंतकात दैनंदिन व्यवहार ज्या गोमंतकी बोलीत होतो त्या बोलीचा वापर गोमंतकातील मराठी लेखकांनी साहित्यातील जीवनचित्रणासाठी वा भावस्पंदने टिपण्यासाठी केला आहे. बिगर गोमंतकीय वाचकाला या बोलीची आणि विशेषत: या बोलीच्या मागे असलेल्या सांस्कृतिक संदर्भांची ओळख नसल्यानेच त्यांच्या आस्वादात व्यत्यय येऊ नये म्हणूनच हा छोटासा प्रयत्न केला आहे.

**टीप :** १) गोमंतकी बोली याचा अर्थ दैनंदिन व्यवहारासाठी गोमंतकात वापरली जाणारी बोली इतकाच अर्थ मला अभिप्रेत आहे.

**२) मुक्तीनंतर गोव्यात मराठी साहित्याची गुणात्मक आणि संख्यात्मक वाढ झाली. नरेंद्र बोडके, पुष्पाग्रज, सुदेश लोटलीकर, तडकोड यांच्यासारखे कवी, सचिन कांदोळकर, सुमेधा कामत यांच्यासारखे ललित लेखक, विठ्ठल ठाकूर, नारायण महाले, महादेव कंग्राळकर, सुरेखा नाईक; वासंती नाडकर्णी असे कथाकार आणि अवधूत कुडतरकरांसारखे अनेक कादंबरीकार निर्माण झाले असले तरी या साऱ्यांच्या साहित्याचा परामर्श नावासहित या लेखात घेता आला नाही. त्यामुळे आजच्या आणि मागच्या पिढीतील मानदंड ठरलेल्या अशा काही मोजक्याच साहित्यिकांच्या साहित्याचा संदर्भ घेतला आहे.**

**डॉ. विद्या प्रभुदेसाई**

**'यशश्री' दादा वैद्य हायस्कूलजवळ, कुर्टी फोंडा, गोवा**

❑



अनुक्रमणिका

# आजकालची हिंदी साहित्यसृष्टी

❑

डॉ. सौ. सारिका ठोसर (जबलपूर)

साहित्य ही एक सामाजिक संस्था आहे. त्यामुळे समाजात परिवर्तन झाले की त्याचे पडसाद साहित्यात ऐकू येतात तसेच साहित्यामुळे समाजाची जडणघडण होते. असे समाज आणि साहित्य यांचे परस्परावलंबी नाते आहे.

हिंदी साहित्यातही मराठीसारखेच काव्य, नाटक, एकांकिका, उपन्यास (कादंबरी), निबंध, आलोचना (समीक्षा), ललित गद्य इत्यादी वाङ्मयप्रकार आहेत.

आधुनिक नवकविता ही १९४३ च्या आसपास लिहिली जाऊ लागली. याचे श्रेय कवी अज्ञेय (सच्चिदानंद हिरानंद वात्स्यायन) यांना जाते. हे हिंदीतील आघाडीचे नवकवी. यांना १९७८ मध्ये 'ज्ञानपीठ पारितोषिका'ने सन्मानित केले गेले. त्यांनी 'तारसप्तक' या शीर्षकाने तीन कवितासंग्रह संपादित केले. यात प्रामुख्याने कवी अज्ञेय, गजानन माधव मुक्तिबोध, नेमीचंद्र जैन, गिरिजाकुमार माथुर, प्रभाकर माचवे, रामविलास शर्मा, भारतभूषण अग्रवाल इत्यादी कवींचा समावेश होतो. यातील काव्याचे वैशिष्ट्य म्हणजे अहंकारनिष्ठ व्यक्तिवाद, अति बौद्धिकता, आणि उपमानांचे नावीन्य.

१९५० मध्ये नवीन कवितेमध्ये काही परिवर्तने दिसून येतात. या कवितांमध्ये नवीन भावबोध, आधुनिक युगातील विचारांचा निर्देश आणि नवीन भाषाशैली दिसते. यात प्रामुख्याने दुष्यंतकुमार यांचे 'साये की धूप', नरेश मेहता यांचे 'सराए की एक रात', आणि त्यांचे ज्येष्ठ समकालीन सूर्यकांत त्रिपाठी-निराला यांचे काव्यसंग्रह समाविष्ट होतात.

गजानन माधव मुक्तिबोध यांचे हिंदी साहित्यातील योगदान अभूतपूर्व आहे. आपल्या लेखणीने हिंदी साहित्याचा प्रवाहच आमूलाग्र बदलून टाकला. ते हयात असेपर्यंत त्यांना कीर्ती लाभली नाही. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे सर्व साहित्य पुस्तकरूपाने प्रकाशित झाले. 'मुक्तिबोध रचनावली'चे ६ खंड प्रसिद्ध आहेत. 'एक साहित्यिक की डायरी' यात त्यांनी स्वतःच्या कवितांकडे पाहण्याचा एक नवीन दृष्टिकोन रसिकांना दिला. म. प्र. सरकारने मुक्तिबोधांना सन्मान देण्यासाठी 'मुक्तिबोध पीठा'ची स्थापना केली आहे. त्यात नवीन कवींना प्रोत्साहन मिळावे म्हणून अभ्यासवृत्ती आहे. तसेच उत्कृष्ट कवितेला दरवर्षी पुरस्कारही



अनुक्रमणिका

दिला जातो. 'मणि कौल' नावाच्या निर्मात्याने मुक्तिबोधांच्या जीवनावर एक Art Film हा तयार केली आहे. तिचे नाव, 'सतह से उठता हुआ आदमी' हे आहे. डाव्या विचारधारेचे ते सर्वश्रेष्ठ कवी असून मार्क्सवादी विचारांचा त्यांच्या मनावर जबरदस्त पगडा जाणवतो. मौलिक विचार-संपन्नता, सामाजिक चिंतेने व्यापलेले मन, बहुमुखी प्रतिभेचे धनी हे त्यांचे विशेष होत. त्यांच्या कविता प्राणवान आहेत. ते म्हणतात–

***'कोशिश करो, कोशिश करो, कोशिश करो,***
***जीने की, जमीन में गढ़कर भी।***

१९६२ मध्ये अकवितेने जन्म घेतला. तिने परंपरेला संपूर्ण त्याज्य मानले. नैतिकता, आदर्श, परस्परसंबंधातील पवित्रता, सामाजिक मूल्यांवरील उडालेल्या विश्वासाचे यात दर्शन घडते. या कवितांचे आयुष्य ५-६ वर्षेच होते. त्यातील काही कवी– जगदीश चतुर्वेदी, राजकमल चौधरी हे होत.

सातव्या किंवा सत्तरनंतरच्या दशकात समकालीन काव्य अवतीर्ण झाले. त्याने कवितेतील दिशाहीन विद्रोहाला सावरण्याचा प्रयत्न केला आणि एक निश्चित सामाजिक आणि राजनैतिक वळण त्या काव्याला लागले. कवी 'धूमिल' यांना याचे श्रेय द्यावे लागेल. त्यानंतरच्या काव्यात कवी आपल्या व्यक्तिगत अनुभवांच्या माध्यमातून सखोल संवेदना प्रगट करू लागले. त्यातही प्रगतिशील चेतनाच अधिक सक्रिय होती. कवितेच्या मुख्य धारेबरोबरच गीत आणि नवगीतही निरंतर विकसित होत गेले. परंतु या कवितेचे पाय जमिनीला चिकटलेले होते. सध्या उत्तर आधुनिक कविता लिहिल्या जात आहेत. त्यांत चार्वाक संस्कृतीचे प्रतिबिंब स्पष्टपणे दिसते.

यंदाचा साहित्य अकादमी पुरस्कार हिंदीचे ज्येष्ठ कवी 'राजेश जोशी' यांच्या 'दो पंक्तियों के बीच' या काव्यसंग्रहाला मिळाला. यातील शीर्षक-कवितेत कवी म्हणतो–

***कविता की दो पंक्तियों के बीच, मैं वह जगह हूँ,***
***जो सूनी सूनी सी दिखती है हमेशा।***
***यहाँ आनेसे पहले, अपने जूते बाहर उतारकर आना***
***कि तुम्हारे पैरो की कोई आवाज न हो***
***एक जरा सी बाहरी आवाज नष्ट कर देगी***
***मेरे पूरे जादुई तिलिस्म को।***

कवी निराला यांच्या काव्यात लोकाभिमुखता हा प्रमुख गुण होता. त्यांच्या प्रगतिवादी कविता छंद, भाषा आणि भावभूमी अशा सर्वच दृष्टींनी छायावादाच्या प्रभावापासून मुक्त आहेत. 'कुकरमुत्ता', 'गर्म पकौडी', 'प्रेमसंगीत', 'रानी और कानी', 'रेफरीकशक्ती' या कविता अशाच प्रकारात मोडतात. त्यांची 'तुलसीदास' ही दीर्घ कविता हिंदी साहित्याला अपूर्व अशी देणगी आहे. त्या कवितेत भारताला सांस्कृतिक आणि सामाजिक पराजयाच्या खोल गर्तेतून बाहेर काढण्याचा संकल्प आहे.

छायावादानंतरच्या काळात हास्य व्यंग्य कवितांची एक लाट आली. कवी निराला यांनी, त्यांचे सामाजिक जीवनातील विविध अनुभव आणि सूक्ष्म निरीक्षणशक्तीमुळे उत्कृष्ट व्यंग्य कविता लिहिल्या. 'कुकरमुत्ता', 'मास्को डायग्लस', 'गर्म पकोडी', 'प्रेमसंगीत' या त्यांच्या गाजलेल्या व्यंग्य कविता. कवी अज्ञेय यांची 'सांप' आणि भवानीप्रसाद मिश्र यांची 'गीत फरोश' या कविता अतिशय प्रसिद्ध व्यंग्य कविता आहेत. या काळात व्यंग्य कविता खूप बहरली. परंतु ती दोन भागांत विभागली गेली. (१) मंचीय कविता, (२) मंचेतर कविता. पहिल्या प्रकारात कलात्मकतेबरोबर गंभीर व्यंग्य लिहिणारे कवी निर्माण झाले, तर दुसऱ्यात सामान्य गर्दीला हसविणाऱ्या मंचीय कवितांची परंपरा निर्माण झाली. मंचीय कवितांतील व्यंग सामाजिक विसंगतींवर आधारलेले बाहुल्याने आढळते. तिचे विषयही हलकेफुलके, ऐकताक्षणीच हास्य निर्माण करणारे असे आहेत. अशा कविता लिहिणाऱ्यांची संख्या खूप मोठी असली तरी तिला उच्च साहित्यिक दर्जा मिळालेला नाही. असे असले तरी उच्च साहित्यिक जाण असणाऱ्या व्यंग्य कवितांची निर्मितीही काही कवींनी केली आहे. हरिशंकर शर्मा, बेढब बनारसी, कांतानाथ पांडे-चोंच, गोपालप्रसाद व्यास, बेधडक बनारसी, काका हाथरसी, रमई काका, बरसाने लाल चतुर्वेदी ही या क्षेत्रातील प्रसिद्ध नावे. त्यांची स्वत:ची अशी खास शैली आहे. बेढब बनारसीचे हास्य संयत, शिष्टमान्य आणि सांकेतिक आहे. त्यांच्या कवितांत विषय-वैचित्र्य आढळते. हरिशंकर शर्मांनी उथळ विषयांना टाळून सामाजिक आणि राष्ट्रीय विसंगतींवर प्रहार करणारी कविता लिहिली आहे. काका हाथरसींनी अनेक हास्य कविसंमेलने जिंकली. अशोक चक्रधर, हुल्लड मुरादाबादी, शैल चतुर्वेदी यांनीही हास्य-व्यंग्य कवितेचे दालन समृद्ध केले.

समकालीन कादंबरीक्षेत्रात सुधारणावादी जीवनदृष्टी प्रामुख्याने आढळते. विषयात वैविध्य आहे. मनोविश्लेषणात्मक, प्रादेशिक, सामाजिक, ऐतिहासिक, पौराणिक कादंबऱ्यांचे बाहुल्य आहे. जीवनातील विविध पैलूंचे दर्शन त्यातून घडते. कथानकाशिवाय फक्त मानसिक आंदोलनावरही काही कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. त्याचेही स्वागत रसिकांनी मोकळ्या मनाने केले. या युगाचे वैशिष्ट्य म्हणजे सीमित क्षेत्रात असीमित गोष्टींना आपल्या कवेत घेण्याचे सामर्थ्य आधुनिक कादंबरीने दाखविले आहे. या कादंबऱ्यांत कथानक, रचनासौंदर्य, विचार आणि संदेश या सर्वांचाच विकास झाला असून त्या सामाजिक पार्श्वभूमीवर लिहिल्या गेल्या आहेत. अनुवादाचे कामही मोठ्या प्रमाणात झालेले आढळते.

स्वातंत्र्यानंतर पेटलेले जनमानस, सामाजिक संघर्ष, व्यक्ती आणि कुटुंबातील ताणतणाव, समाजात दिसून येणारी विघटनात्मक परिस्थिती, भ्रष्टाचार, आर्थिक शोषण, नैतिक मूल्यांचे पतन, रूढी-परंपरांविरुद्ध उभे ठाकलेले बंड, आधुनिकतेचे जबरदस्त आकर्षण, स्त्रीपुरुष संबंधांची बदलती दृष्टी, नोकरीपेशातील स्त्रियांच्या समस्या, मानसिक ताणाखाली वावरणारी नवीन पिढी, स्वार्थी राजकारणी व्यक्ती इ. विषयांचे चित्रण समकालीन कादंबरीत सापडते. आज सामाजिक यथार्थता आणि मनोविश्लेषणात्मक भावनांचे चित्रण कादंबरी या वाङ्मयप्रकारात

जितके दिसते तितके अन्यत्र सापडणे कठीण. मन्नू भंडारी– 'आप का बंटी', भीष्म साहनी– 'कडियाँ', यादवेन्द्र शर्मा– 'गुनाहों की देवी', श्रीलाल शुक्ल– 'रागदरबारी' (व्यंगात्मक शैली) इ. हिंदीतील प्रख्यात कादंबरीकार व कादंबऱ्या आहेत. साहित्य अकादमी पुरस्कृत, 'अलका सरावगी' यांची 'कलिकता बायपास' आणि 'शेष कादंबरी' या अतिशय लोकप्रिय कादंबऱ्या आहेत.

कादंबरीकार 'यशपाल' यांच्या कादंबऱ्या वास्तववादी आहेत. त्यांचे प्रारंभिक जीवन क्रांतिकारकांशी संबंधित असल्याने मार्क्सवादी विचारधारेचा प्रभाव त्यांच्या साहित्यावर स्पष्टपणे जाणवतो. 'अमिता' आणि 'दिव्या' या दोन ऐतिहासिक कादंबऱ्या सोडल्या तर त्यांच्या इतर कादंबऱ्या– 'दादा कामरेड', 'मनुष्य के रूप', 'झूठा सच' इ.त समाजवादी वास्तवताच चित्रित झालेली आढळते. त्यांची 'झूठा सच' कादंबरी महाकाव्यात्मक कादंबरी म्हणून हिंदी साहित्यात ओळखली जाते. यशपाल यांची 'मेरी तेरी उसकी बात' ही कादंबरी भारताच्या स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर काळातील सामाजिक आणि राजकीय जीवनावर आधारित आहे. यशपालांच्या कथांवर फ्राइडचा प्रभाव जाणवतो.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर समाजात झालेल्या बदलांमुळे 'नई कहानी' हा बहुचर्चित वाङ्मयप्रकार अस्तित्वात आला. कमलेश्वर, राजेन्द्र यादव, मोहन राकेश हे नवकथेचे प्रमुख प्रणेते आहेत. अती यथार्थवादी दृष्टिकोन, कथेमध्ये नवीन प्रतिमानांचा प्रयोग, स्त्रीमनातील अंतर्द्वंद्व, मनोविश्लेषणात्मक विवेचन इ. त्यात आढळते. या काळात कथाक्षेत्रात स्त्रियांचे योगदान बहुमोल आहे. त्यांनी स्त्रीची कुचंबणा, तिचे शोषण, तिचा स्नेह, उल्हास, स्त्रीपुरुष संबंध इ. विषयांवर लेखन केले आहे. महिला कथाकारांनी स्त्रीमनाच्या तळाचा शोध घेऊन त्याचे पदर हळुवारपणे उलगडले आहेत. समाज जागृती करण्यातही त्यांचे लेखन वाखाणण्याजोगे आहे.

धर्मवीर भारती, भीष्म साहनी, अमरकांत, शेखर जोशी, मेहरून्निसा परवेज, इ. बरोबरच यशपाल, जैनेंद्र, अज्ञेय, या सर्व साहित्यिकांनी कथा वाङ्मयात मोलाची भर घातली. 'नकली हीरे' ही मन्नू भंडारी यांची, स्त्रीमनाची कथा अंतर्मुख करणारी आहे. पैसा कमी असला तरी पतिप्रेमाचा अनमोल दागिना तिला प्राप्त झाल्याने संतुष्ट 'इंदू' एकीकडे तर लौकिक वैभवात आकंठ बुडालेली परंतु पतिप्रेमाला वंचित 'सरन' दुसरीकडे अशा दोन बहिणींची ही कथा अतिशय बोलकी आहे. 'बयान' या कमलेश्वरच्या कथेत कथनासाठी नवीन पद्धतीचा उपयोग केला आहे. तर भीष्म साहनी यांच्या 'चीफ की दावत' या कथेत आजच्या भौतिकतेकडे ओढा असणाऱ्या जगात 'आई' ही देखील कशी उपयोगी वस्तू म्हणून वापरण्यात येते याचे मर्मस्पर्शी दर्शन घडते.

हिंदी नाटकांचा विचार केल्यास असे दिसते की, युगचैतन्य आणि एका विशिष्ट विचारधारेचा प्रभाव त्यात प्रामुख्याने दिसतो. पाश्चात्त्य संस्कृती आणि विचारधारेचाही एक सूर त्यात मिसळला आहे. जीर्ण रूढी, परंपरा यांचे खंडन मोठ्या प्रमाणात झाले आहे. व्यक्तिमनातील अंतर्द्वंद्व, मानसिक आंदोलन आणि मनोविश्लेषणात्मक सूक्ष्म निरीक्षण त्यात



अनुक्रमणिका

आढळते. आजचे नाटक आकारात लहान असले तरी आशयगर्भ आहे. त्याचा संबंध बहुतांशी वर्तमानाशी असून वास्तववादाचा (Realism) पगडा त्यावर आहे. स्वातंत्र्योत्तर काळात लिहिलेल्या नाटकांत प्रामुख्याने व्यवस्थाविरोध आढळतो. सामाजिक, आर्थिक, राजनैतिक, कौटुंबिक अशा विविध पातळ्यांवर हा संघर्ष चालतो. समकालीन नाटककारांत उदयशंकर भट्ट यांचे 'स्कंदगुप्त', जयशंकर प्रसाद यांचे 'ध्रुवस्वामिनी', धर्मवीर भारती यांचे 'अन्धा युग', मोहन राकेश यांचे 'आषाढ का एक दिन', 'लहरों का राजहंस', शंकर शेष यांचे 'एक और द्रोणाचार्य', शरद जोशी यांचे 'अंधों का हाथी' ही नावे प्रामुख्याने घ्यावी लागतील. सेठ गोविन्ददास, उपेन्द्रनाथ अश्क, विष्णू प्रभाकर हेही श्रेष्ठ दर्जाचे नाटककार आहेत. समकालीन एकांकिकेवर पाश्चात्त्यांचा प्रभाव जाणवतो. या क्षेत्रात, प्रताप नारायण मिश्र– 'चौपट चपेट', काशीनाथ खत्री– 'ग्रामीण पाठशाला', उपेन्द्रनाथ अश्क– 'परदा गिराओ', जगदीशचंद्र माथुर– 'ओ मेरे सपने' या कृती उल्लेखनीय आहेत.

स्वातंत्र्योत्तर काळातील निबंधात विषयांची व्यापकता, सखोल चिंतन, सघन विचारशीलता प्रामुख्याने दिसते. याच काळात ललित आणि कलात्मक निबंधांचीही निर्मिती मोठ्या प्रमाणात झाली त्यात विषयांची विविधताही आहे. व्यंग्यात्मक, वैचारिक, ललित इत्यादी.

प्रमुख निबंधकारांचा विचार करताना सर्वप्रथम हरिशंकर परसाईजींचे नाव डोळ्यासमोर येते. परसाई आणि गजानन माधव मुक्तिबोध हे जिवलग मित्र होते. कुणाचीही ताबेदारी नको म्हणून नोकरी न करता परसाईंनी साहित्यालाच सर्वस्व मानले. आयुष्याची शेवटची २० वर्षे ते अंथरुणालाच खिळलेले होते. परंतु हे शारीरिक आजारपण त्यांच्या तरल मनावर कधीच आघात करू शकले नाही. स्वातंत्र्यपूर्व काळातील भारताचे दर्शन प्रेमचंद यांच्या साहित्यात जसे होते तसेच स्वातंत्र्योत्तर काळातील भारताचे दर्शन परसाईंच्या साहित्यात घडते. 'सदाचार का ताबीज', 'भोलाराम का जीव', 'निंदारस' हे काही त्यांचे गाजलेले निबंध होत.

शरद जोशी– 'कहहुँ लिखी कागद कोरे', प्रभाकर माचवे– 'मुँह, गला, गाली' हे प्रसिद्ध निबंधकार व निबंध आहेत. या क्षेत्रात डॉ. नगेन्द्र यशपाल, बालमुकुन्द गुप्त यांचीही कामगिरी अविस्मरणीय आहे. समीक्षाक्षेत्रातही मोठे काम झाले आहे. आचार्य रामचंद्र शुक्ल, हजारीप्रसाद द्विवेदी, डॉ. नगेन्द्र, डॉ. रामविलास शर्मा प्रख्यात समीक्षक आहेत.

हिंदी साहित्याला आतापर्यंत ५ ज्ञानपीठ पुरस्कार मिळाले आहेत. सर्वप्रथम १९६२ मध्ये सुमित्रानंदन पंत, यांच्या 'चिदंबरा'ला ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले. 'युगवाणी', 'ग्राम्या' हे त्यांचे प्रसिद्ध काव्यसंग्रह आहेत. त्यांच्या काव्यात चिंतनशीलता असून त्यांच्या भाषेतून आणि संस्कारातून मूलतः छायावादच डोकावत असला, तरी या काळात त्यांनी कवितेला नवीन चिंतन आणि नवीन विषयाचे जग प्राप्त करून दिले. मार्क्सवादानंतर अरविन्द-दर्शनाने प्रभावित झालेल्या पंतांच्या कवितेत दोन्ही विचारांचे प्रतिबिंब दिसते. 'स्वर्ण किरण', 'स्वर्णधूली', 'शिल्पी', 'लोकायतन' इत्यादी काव्यसंग्रहांत योगी अरविन्दांचा भौतिकवाद आणि त्यांचाच अध्यात्मवाद यांचा समन्वय आढळतो.

रामधारी सिंह 'दिनकर' यांच्या १९७२ मध्ये 'उर्वशी' या काव्याला ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले. कवीने उर्वशी आणि पुरुरव्याच्या प्राचीन आख्यानक कथेला नवीन संदर्भात दर्शविले आहे. हे प्रेम आणि सौंदर्याचे काव्य आहे. दिनकरांच्या भाषेत नेहमी साधेपणा जाणवतो, परंतु 'उर्वशी'मध्ये भाषेचा साधेपणा अलंकृत आणि अभिजात रूपाची चमक घेऊन आला आहे. 'रश्मीरथी' या काव्यात महाभारतातील कर्णाला, आधुनिक मानवतावादाचा वेष चढविला आहे. 'अर्धनारीश्वर', 'मिट्टी की ओर', 'रेती के फूल' हे त्यांचे वैचारिक निबंध अतिशय प्रसिद्ध आहेत. त्यांनी आपल्या राष्ट्राची अस्मिता भावनेपुरती मर्यादित न ठेवता चिंतन आणि परीक्षणांनी त्याला स्वस्थ स्वरूप दिले आहे.

सच्चिदानंद हिरानंद वात्स्यायन-अज्ञेय– यांना १९७२ मध्ये 'कितनी नांवोमें कितनी बार' या पुस्तकासाठी ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले. त्यांच्या काव्यात सूक्ष्म संवेदनशीलतेबरोबरच सजग बौद्धिकताही दिसून येते. 'शेखर– एक जीवनी' या कादंबरीमुळे हिंदी कादंबरीक्षेत्राला एक नवीन वळण लागले. समीक्षकांनी त्यावर खूप टीका केली. कथानक, शिल्प आणि भाषेच्या दृष्टीने तो एक नवीन प्रयोग होता. त्यांच्या कथांमध्ये आत्मसंघर्ष हा प्रामुख्याने दिसून येणारा घटक आहे. त्यांच्या 'गैग्रीन', 'पठार का धीरज' इत्यादी कथा वास्तवावर आधारित आहेत. त्यांचे निबंधलेखन अनुभूतीपूर्ण आहे. 'त्रिशंकू', 'आत्मनेपद' इत्यादीमध्ये अनुभूतीचे वैचारिक विश्लेषण दिसून येते.

महादेवी वर्मा यांना १९८२ मध्ये 'यामा' या काव्यासाठी ज्ञानपीठ मिळाले. विरहवेदना हा त्यांच्या काव्याचा केंद्रबिंदू असे. संयोग आणि वियोग प्रेमाच्या अनेक छटा त्यांनी काव्यात रंगविल्या आहेत. त्यांच्या गीतकाव्यात भावना उत्कट असली तरी त्यावर गूढगुंजनाचे आवरण असल्याने त्याच्या प्रभावाची तीव्रता कमी होते. महादेवींच्या काव्यात सूक्ष्म चित्रात्मकता बाहुल्याने आढळते. गद्य आणि पद्य या दोन्ही वाङ्मयप्रकारांत त्यांनी खूप लेखन केले आहे.

नरेश मेहता यांना १९९२ मध्ये साहित्यातील त्यांच्या उत्कृष्ट योगदानासाठी ज्ञानपीठ मिळाले. त्यांचे 'संशय की एक रात' एक उत्कृष्ट प्रबंधकाव्य आहे. यात श्रीरामाच्या मनातील संशयाचे चित्रण केले आहे. समुद्रावर पूल बांधत असताना श्रीरामाचे मन संशयग्रस्त होते की, 'एका सीतेसाठी एवढा मोठा नरसंहार योग्य की अयोग्य?' परंतु शेवटी आपल्या सहकाऱ्यांबरोबर विचारविमर्श केल्यावर रामाला जाणवते की, युद्ध हे सीतेसाठी नसून, प्रजेसाठी आहे. 'सुबह के घंटे' आणि 'खंडित यात्राएँ' ही नाटके अतिशय प्रसिद्ध आहेत. 'यह पथ बंधु था' आणि 'नदी यशस्वी है' या कादंबऱ्या मांडणीच्या दृष्टीने आधुनिक आहेत.

हिन्दी साहित्यात प्रवासवर्णनाचेही बाहुल्य आहे. आत्मकथात्मक, अनौपचारिक, संस्मरणात्मक आणि मनोरंजक असे काहीसे या वाङ्मयप्रकाराचे स्वरूप आहे. अज्ञेय यांचे, 'अरे यायावार, रहेगा याद', मोहन राकेश यांचे 'आखरी चट्टान तक', अमृतलाल बेगड यांचे 'सौंदर्य की नदी नर्मदा' आणि 'अमृतस्य नर्मदा' उल्लेखनीय आहेत. ('सौंदर्य की नदी नर्मदा' या पुस्तकाचा मराठी अनुवाद 'सौंदर्यवती नर्मदा' या नावाने इंदोरच्या मीनल फडणीस यांनी

केला आहे.) यात लेखकाची सौंदर्यदृष्टी सर्वत्र जाणवते शरदाचे चांदणे पाहून लेखकाच्या मनात येते की, जणू सूर्याचा प्रकाश चंद्रावर आपटून कौमुदी होतो म्हणजे चंद्र हा जणू काही अनुवादकच आहे. तो उन्हाचा चांदण्यात अनुवाद करतो हा किती दिव्य अनुवाद आहे! 'भाकर ही प्रकृती, चपाती ही संस्कृती तर पराठे ही विकृती होय' अशी सुभाषितवजा वाक्यांची यात पखरण आहे.

रेखाचित्र हा आणखी एक प्रकार मोठ्या प्रमाणात हिंदी साहित्यात आढळतो. यातील पात्रे अंतर्बाह्य सजीव असतात. हा शब्द इंग्रजीच्या 'स्केच' या शब्दापासून आला आहे. यात कलात्मक शब्दरेखांनी व्यक्ती, वस्तू किंवा घटनेचे असे वर्णन केलेले असते की ज्यामुळे ती गोष्ट सजीव होऊन रसिकांच्या मनात अंकित होते. रामवृक्ष बेनीपुरी, बनारसीदास चतुर्वेदी, महादेवी वर्मा यांची नावे या बाबतीत उल्लेखनीय आहेत.

बाल साहित्याचे दालन हिंदी साहित्यात विशेष समृद्ध नाही. आज पुरस्कारांचे बाहुल्य असूनही अनुवादाचे काम मंदावले आहे. मराठीकडून प्रेरणा घेऊन हिंदीतही दलित साहित्याचे लेखन होऊ लागले आहे. ओम् प्रकाश वाल्मिकी यांचे 'जूठन' हे अतिशय लोकप्रिय पुस्तक आहे.

समग्र हिंदी साहित्याचा विचार केला असता असे जाणवते की, साहित्य हा समाजाचा आरसा असल्याने, समाजातील धगधगणाऱ्या प्रश्नावरच साहित्यनिर्मिती झाली आहे. सर्वच वाङ्मयप्रकारांत विषयांची समानता दिसते. लेखकाच्या मनोवृत्तीप्रमाणे तिच्या मांडणीत आणि अनुभूतीत फरक पडत जातो. आज उद्‌ध्वस्त होणारी कुटुंबव्यवस्था, खेड्यांचे शहरांमध्ये विलीनीकरण, यांत्रिक मानवीकरण, व्यक्तिस्वातंत्र्य, स्त्रीची जागृत झालेली अस्मिता, तिने करिअरला जीवनात सर्वोच्च मानले असल्यामुळे भावी पिढीच्यापुढे निर्माण होणाऱ्या विदारक समस्या, नैतिक मूल्यांचे पतन, राजनैतिक भ्रष्टाचार इत्यादींचे चित्रण प्रामुख्याने आढळते. रूढीपरंपरांची बंधने माणसाने प्रयत्नपूर्वक तोडली, पण त्यातून निर्माण झालेला एकटेपणा त्याला कुरतडू लागला. आपसूकच माणूस आत्मवंचनेच्या दयनीय परिस्थितीला सामोरा गेला. एक दिशाहीन भटकणे त्याची नियती होऊ घातली आहे. त्यामुळे त्याने स्वत:चा व समाजाचाही घात केला आहे.

जबलपूर हे साहित्यिकांचे शहर आहे. आचार्य विनोबा भाव्यांनी जबलपूरला 'संस्कारधानी' हे नामाभिधान दिले आहे. सुभद्राकुमारी चौहान, हरिशंकर परसाई, अमृतलाल वेगड, कवी मलय, ज्ञानरंजन, कामताप्रसाद गुरू, भवानीप्रसाद तिवारी इत्यादी मान्यताप्राप्त साहित्यिकांचे हे शहर आहे. इथल्या मातीत साहित्याचा सुवास दरवळतो आहे.

**डॉ. सौ. सारिका ठोसर**
११८ 'साकेत', सन्मतिनगर, आधारताल,
जबलपूर ४८२००४ (म. प्र.)

# हा तों साहित्यकुसुमांचा आस्वादु

❑

## " 'बारोमास' : शेतकऱ्याच्या बारमाही वेदनेची गाथा."

*(बारोमास' : सदानंद देशमुख. कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती– २००२. पृष्ठ– ३४९)*

मराठी ग्रामीण साहित्यात ग्रामीण साहित्यिकांच्या दुसऱ्या व तिसऱ्या पिढीने नेहमीच वास्तववादी लेखनाचा आग्रह धरला व तशा प्रकारचे लेखनही केले हे सर्वश्रुतच आहे. ग्रामीण साहित्य चळवळीने तिसऱ्या पिढीतील व त्यानंतरच्या लेखकांना अशा प्रकारच्या वास्तववादी लेखनाचे बळ दिले आहे. प्रा. सदानंद देशमुख हे सुद्धा अशाच ग्रामीण लेखकांपैकी एक. नुकतीच त्यांची 'बारोमास' ही कादंबरी कॉन्टिनेन्टल प्रकाशनाने प्रकाशित केली आहे. लेखकाने स्वत: कादंबरीच्या सुरुवातीला एक कटू सत्य सांगितलं आहे– 'शेतकऱ्यांच्या जीवनाला बारोमास वेढून असणाऱ्या जन्मजात वेदनेच्या हुंकारातून ही कादंबरी आकाराला आली आहे'– त्याचा प्रत्यय कादंबरी वाचताना पानोपानी येतो.

स्वातंत्र्यापूर्वी व स्वातंत्र्यानंतरही इथल्या शिक्षणव्यवस्थेकडे ग्रामीण तरुणाने नोकरी मिळविण्याचे एक साधन एवढ्याच दृष्टिकोनातून पाहिले. शिक्षणव्यवस्थेतही तशाच प्रकारची व्यवस्था केली गेली. त्यामुळे ह्या ग्रामीण तरुणांची जाणीव खऱ्या अर्थाने कधी जागीच होऊ शकली नाही. आमूलाग्र क्रांतिप्रवण असे आंबेडकरी विचार दलित तरुणांपर्यंत पोहोचल्यामुळे दलित तरुण विद्रोह करू शकला; मात्र ग्रामीण तरुणांपर्यंत त्याला क्रांतिप्रवण करू शकतील असे म. फुल्यांचे विचार इथल्या शिक्षणव्यवस्थेने पोहोचूच दिले नाहीत. परिणामी शिक्षण मिळालेला ग्रामीण तरुण नोकरी मिळाली की 'राजाराणी'च्या संसारात रममाण झाला व आपल्या मातीशीच बेइमान होत गेला. दुसऱ्या बाजूला शेतकरी कुटुंबातून ग्रामीण मतदारांच्या मतांवर निवडून गेलेला लोकप्रतिनिधीही शेतकऱ्यालाच लुबाडायला सज्ज झाला; यात त्यांचा दोष नाही. आत्मभानाअभावी हे सारे घडते आहे. हे आत्मभान नाही म्हणूनच त्याला शेतकरी संघटनेपेक्षा कोणताही राजकीय पक्ष जवळचा वाटतो आहे. ग्रामीण साहित्य चळवळीतून प्रेरणा घेऊन पुढे आलेल्या काही लेखकांमध्ये मात्र अलीकडच्या काळात हे आत्मभान दिसू लागले आहे. सदानंद देशमुखांच्या तर सर्वच लेखनात ते दिसते.

'बारोमास' ह्या कादंबरीतूनही शेतकऱ्यांबद्दलचे लेखकाचे हे आत्मभान प्रकट झाले आहे. रूढार्थाने कादंबरीकडे पाहिल्यास ती एका शेतकऱ्याच्या शिकलेल्या बेकार तरुणाची –एकनाथाची– कहाणी आहे. एकनाथ रात्रंदिवस अभ्यास करून मराठीत एम. ए. करतो, बी. एड्. ही करतो, पण डोनेशनच्या पैशाअभावी त्याला कुठेही नोकरी मिळत नाही. त्याला

नोकरी मिळेल या आशेवर वीजमंडळातला एक इंजिनियर आपली मुलगी – अलका – त्याला देतो. नोकरी न मिळाल्याने एकनाथच्या आख्ख्या प्रपंचाचा विचका होतो. एकनाथचा भाऊ मधू व त्याचे मित्रही असेच बेकार. पडक्या वाड्यात, भूमीत धन सापडेल म्हणून नाना प्रकारचे अघोरी उपाय करीत रात्र रात्र जमीन खोदत बसतात. त्यांनाही डोनेशन देण्यासाठीच पैसा हवा आहे. शेतीच्या उत्पन्नातून तो मिळू शकत नाही, म्हणून मग शेती गहाण ठेवून मधूच्या नोकरीसाठी पैसे भरले जातात, पण पैसेही जातात व नोकरीही मिळत नाही. तेलही गेले व तूपही गेले अशी ही अवस्था. तिकडे नोकरी नाही परिणामी किमान सुखसुविधा नाहीत म्हणून एकनाथची बायकोही त्याला सोडून जाते. या मुख्य कथासूत्राभोवती कादंबरीची रचना करताना लेखकाने शेतकरी जीवनाच्या अनेक कळा-अवकळा रेखाटल्या आहेत. मुख्य कथानकाला अनुषंगून अनेकविध उपकथानकांच्या आधारे लेखकाने अनेक विषय कादंबरीत गोवले आहेत. मात्र हे विषय (वा ही उपकथानके) कुठेही उपरेपणाने येत नाहीत. कथानकाचा सेंद्रियबंध लेखकाने यथोचितपणे सांभाळला आहे.

नव्या संकरित वाणाला नानू आज्यासारखा पारंपरिक मानसिकतेचा शेतकरी विरोध करतो, तर नव्या मानसिकतेचा व्यावहारिक शेतकरी संकरित वाणालाच सर्वस्व मानतो. नव्या संकरित वाणाने शेतीचे उत्पन्न वाढल्याचा भास होतो, मात्र प्रत्यक्षात नानूआजाच्या भाषेत सांगायचे म्हणजे– 'आरे अशी कशी ही आधुनिक शेती? तुमच्या घरात काईच माल नाई. हे तर घर खंदून अंगण भरणं चाललं. तुमच्या खड्ड्यातली माती खड्ड्यातच आटून राह्यली.'– असा हा प्रकार आहे. गावरानच खाण्याचा अट्टहास धरत नानूआजा शेवटी देह ठेवतो. एकनाथला लग्नात मिळालेला रंगीत टी. व्ही; ग्रामीण भागातलं हे एक मनोरंजनाचं साधन. टी. व्ही. बघणारा मुगुटराव रोजगारी गडी. टी. व्ही. वरचे 'आमची माती आमची माणसं' सारखे कार्यक्रम त्याला नको आहेत, तर दोन घटका मनोरंजन करण्यासाठी त्याला रंगीत बाया बघण्याचंच आकर्षण आहे. ग्रामीण भागात पाहिल्या जाणाऱ्या टी. व्ही. चे हे प्रातिनिधिक प्रेक्षकत्व.

अशा प्रकारे कादंबरीतलं प्रत्येक पात्र (व त्या संदर्भातल्या घटना) काही ना काही आशयसूत्र घेऊनच कादंबरीत अवतरतात. अगदी चंद्री मांजर असो, ममता वारे असो अगर दिलीप पवार असो. एकनाथला वाटते कदाचित चंद्री मांजर आपल्याला तिच्या भाषेत शिव्या देत असेल– "लेका एकनाथ्या, काय पसरला वर येऊन? माझ्या दुधाचा काही मेळमाळ लावणं. कशाले झक मारायले पाळलं का मले? म्या दुसरं घर नसतं का पाह्यलं? आता ह्या वयात कोण पाळणार हाये मले? गोजिरवाणं पिल्लू व्हती तव्हाच कशाले ळळा लावला? आता कावून नेट लागून राह्यला? ऊठ! पसरला काय पोसव्या...... बिनफिकऱ्या ...." .... हे केवळ चंद्रीचे मनोगत नाही. अलका तरी दुसरं काय म्हणते आहे? आणि एकनाथचे आईवडील? यांच्याही भावना यापेक्षा वेगळ्या काय असणार? एकनाथला हे सगळे उमजते. हे उमजते म्हणूनच त्याला जास्त जास्त दु:ख होत जाते. शिक्षण घेणं त्याच्या हातात होतं.

चांगले मार्क्स मिळवणं हातात होतं ते त्यानं केलं, पण नोकरी मिळवणं हाताबाहेरचं ठरलं. जमीन विकून डोनेशनला पैसे द्यायला वडील तयार नाहीत व नोकरीशिवाय बायको नांदायला तयार नाही अशा दुहेरी कात्रीत एकनाथ सापडतो. स्वप्न उद्ध्वस्त झालेला एकनाथ विचारचक्रात मात्र सततचा अडकलेला आहे. आपल्या मराठा जातीमुळं (NBC) नोकरी मिळत नाही असं त्याला क्षणभर वाटतं, पण नंतर त्याला लगेच उमगतं की एस. सी. असणारा दिनकर दाभाडेही बेकारच आहे. म्हणजे आज डोनेशनचा पैसाच महत्त्वाचा आहे. तमाम ग्रामीण तरुणांची मानसिकता एकनाथ व्यक्त करतो– "पुढं आपल्या खेड्यापाड्याचं भवितव्य काय? शेतीबाडी पिकत नाही. पिकली तरी मालाला किंमत नाही. पैसा डोळ्याने दिसत नाही. पैशावाचून भागत नाही. आपल्यासारखे शेतकऱ्यांचे पोरं शिकलेले नव्हते, तोपर्यंत सारं ठीक होतं. कळते होईतो ढोरामागे .... अन् कळते झाल्यावर औतामागे .... पण आज शिक्षणामुळे जगातलं बरंवाईट सगळं आपल्याला कळतं. एक, दोन तास घेऊन पंधरा-वीस हज़ार पगार घेतो; अन् दुसरा त्याच पात्रतेचा रोजचे पंधरा रुपये कमावू शकत नाही. आपण तुलना करतो तेव्हा दिसतं, ते सुखी आपण दुःखी.... तेजराव खपके म्हणतात, 'अशानं एक दिवस आपल्या देशात क्रांती होईल आणि ती क्रांती बेसूत लोकायची आसंल. सुतावर नसल्यासारखी. निरा कापाकापी... अन् झपकाझपकी." या मानसिकतेपोटीच मग एकनाथ शेतकरी संघटनेच्या शेतकरी मेळाव्यात सहभागी होतो. शेतकरी संघटनेचे कार्यकर्ते व एकनाथ यांच्यातील चर्चेतूनच शेतकरी संघटनेचे आर्थिक तत्त्वज्ञान लेखकाने चपखलपणे कादंबरीत बसवले आहे. शेतकऱ्याच्या 'बारोमास' दारिद्र्याची कारणमीमांसा त्यातून उलगडत जाते.

बेकारीचे दुःख भोगता भोगता एकनाथ 'विचारी' म्हणून या वाटेनं जातो, पण मधू अन् त्याचे मित्र मात्र टोकाच्या स्वार्थी विचाराने (व पर्यायच नसल्याने) नको ते उद्योग करतात. सोनेरी टोळी स्थापन करून सोनं शोधत फिरतात, पैशासाठी शेतातली झाडं विकून पैशाची गरज भागवतात आणि सोनं सापडत नाही म्हटल्यावर रस्त्यावरच्या गाड्या आडवून सोनं लुटण्याच्या गुन्हेगारी मार्गापर्यंत येऊन ठेपतात. शेतीची दुर्दशा तर कादंबरीभर सततच दिसते. एकनाथचा मेहुणा सावकारी कर्जापायी आत्महत्या करतो. खुद्द एकनाथचा बापही गहाण टाकलेला कल्याणीचा मळा परत मिळत नाही म्हटल्यावर विष घेऊन आत्महत्येचाच प्रयत्न करतो. अलीकडच्या काळात विदर्भात शेतकऱ्यांनी केलेल्या आत्महत्यांना लेखकाने कादंबरीत समर्पक स्थान दिले आहे.

शेतकऱ्याला, त्याच्या शिकलेल्या मुलाला लुबाडणारे अनेक महाभाग लेखकाने रेखाटले आहेत. मात्र लगेच त्यांना खलनायक बनवलेले नाही. व्यवस्थेचा एक भाग म्हणूनच त्यांचे चित्रण येते. शेतकऱ्याच्याच जीवावर जगणारा शेतमजूर सुद्धा मग या व्यवस्थेतला एक होत शेतकऱ्याला अडचणीच्या वेळी खिंडीत पकडू पाहतो.

एकंदरीत अगदी अलीकडच्या आधुनिक काळातील शेतकऱ्याच्या दुर्दैवाचे दशावतार



अनुक्रमणिका

या कादंबरीत सदानंद देशमुखांनी बारकाव्यांनिशी टिपले आहेत. शिक्षणाचा आधार घेऊन या दुर्दैवी अवस्थेतून बाहेर पडू पाहणाऱ्या मुलांची ससेहोलपट चित्रित करण्यात लेखक कमालीचा यशस्वी झाला आहे. सदानंद देशमुख स्वत: एका शेतकरी कुटुंबातील असल्याने त्यांचा अनुभव सच्चा असल्याचा प्रत्यय कादंबरीतून येतो. आपला ग्रामीण जीवनाचा अनुभव, शेतकऱ्याचे चित्र रंगवताना देशमुखांनी पणाला लावला आहे. वैदर्भीय शेतकऱ्याचे चित्र रंगवताना त्यांनी त्याच्या बोलीचा अतिशय चपखल उपयोग करून घेतला आहे. 'मात्र विदर्भाची प्रादेशिक वैशिष्ट्ये पुरेशा प्रमाणात कादंबरीत येत नाहीत' एवढीच काय ती उणीव राहून गेल्यासारखी वाटते.

शेतकरी जीवनाची नागर वाचकाला ओळख करून देणे वा शेतकऱ्याचे दारिद्र्य रेखाटून केवळ कणव निर्माण करणे किंवा मग शेतकरी जीवनातील रोमान्स, भानगडी, भांडणतंटे रेखाटणे या सर्व बाबींना फाटा देत मराठी ग्रामीण कादंबरी खूप पुढे गेली आहे, याचा पुरावा म्हणजे देशमुखांची ही कादंबरी. निवेदनात त्यांनी कथानकाला साजेसे, स्वाभाविक वाटतील असे काही प्रयोगही केले आहेत. उंदीर-मांजराच्या जीवघेण्या खेळाचा सविस्तर उल्लेख येतो. (पृ. १३८-१३९) (हा नेमाड्यांचा प्रभाव का? असा मात्र प्रश्न पडतो.) स्वत:चे चरित्र एकनाथ लीळाचरित्रासारख्या भाषेत रचून बघतो. तर कधी आंधळा माणूस कसा चालत असेल हे अनुभवण्यासाठी डोळे मिटून चालून बघतो. या सर्व प्रयोगांना प्रतिमा-प्रतीकसदृश अर्थ आहे. एकनाथचा संज्ञाप्रवाह रेखाटण्यातही लेखक यशस्वी झाला आहे. कुठेही पाल्हाळ नाही, सांकेतिकता तर अजिबात नाही, अवास्तव, रंजकतेसाठीचा मालमसाला, भडकपणा असल्या गोष्टींना देशमुखांच्या एकूणच लेखनात स्थान असत नाही, तसे ते इथेही नाही. समर्पक भाषाशैली, वास्तव चित्रण व त्या चित्रणावरील स्वाभाविक भाष्य, आशयसूत्रांची यथायोग्य गुंफण, कथानकाची नावीन्यपूर्ण मांडणी यांमुळे ही कादंबरी मराठी ग्रामीण कादंबरीला त्याचप्रमाणे मराठी कादंबरीलाही नवी दिशा देणारी ठरायला हरकत नाही.

**– डॉ. सुधाकर शेलार**
११, रामनगरी, आगरकर मळा
स्टे. रोड. अहमदनगर.

■

## जाणता शेतकरी शास्त्रज्ञ 'डॉ. स्वामीनाथन'

*(जाणता शेतकरी शास्त्रज्ञ 'डॉ. स्वामीनाथन'– लेखक : डॉ. क. कृ. क्षीरसागर, प्रकाशक : भारतीय विचार साधना, पुणे. पृष्ठे : ८०. किंमत रु. ४०/-)*

भारत हा प्रामुख्याने कृषिप्रधान देश आहे. भारताने आज औद्योगिक क्षेत्रातही खूप मोठी आघाडी मारलेली असली तरी अजूनही भारतातील ७० टक्के लोकांची उपजीविका शेतीवरच

अवलंबून आहे. भारतातील शेती बव्हंशी कोरडवाहू म्हणजे पावसावर अवलंबून असलेली अशी आहे आणि कवितेत ''नेमेचि येतो मग पावसाळा!'' असा असलेला हा पाऊस प्रत्यक्षात अतिशय बेभरंवशाचा असतो. अवर्षण, अतिवृष्टी आणि अवेळी-नको तेव्हा येणे, अशा नानाविध प्रकारांनी हा पाऊस पिकांचे भारी नुकसान घडवून आणतो. परिणामी दुष्काळ! हा दुष्काळही भारताच्या पाचवीलाच पूजलेला आहे. ज्ञानेश्वरांच्या काळापासून तो आजतागायत अनेक भीषण दुष्काळांच्या मालिका इतिहासात नोंदल्या गेल्या आहेत. या दुष्काळांनी लक्षावधी लोकांचे बळी घेतले आहेत.

भारताला स्वातंत्र्य मिळाले त्या वेळीही पुरेसे अन्नधान्याचे उत्पादन ही फार मोठी समस्या भारतापुढे उभी होती. नुकताच १९४२-४३ या वर्षात घडून आलेला बंगालचा भीषण दुष्काळ सर्वांच्या ताज्या स्मरणात होता. या दुष्काळाने तीस लाख लोकांचा बळी घेतला होता. त्यामुळे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पं. नेहरू, लालबहादूर शास्त्री, इंदिरा गांधी या सर्व राष्ट्रीय नेत्यांनी अन्नधान्य समस्येला सर्वोच्च प्राधान्य दिले. सर्व राज्यांमध्ये कृषी विद्यापीठे स्थापन करण्यात येऊन कृषीविषयक शिक्षण, संशोधन आणि विस्तार यावर भर देण्यात आला. अन्नधान्यांच्या संकरित आणि उन्नत वाणांची मोठ्या प्रमाणावर प्रात्यक्षिके सर्व राज्यांत घेण्यात आली. लाखो एकर क्षेत्रावर त्यांचे पथदर्शी प्रकल्पही राबवण्यात आले. या सर्वांचा दृश्य परिणाम म्हणजे पूर्वी भारताला प्रतिवर्षी लक्षावधी टन अन्नधान्याची परदेशातून आयात करावी लागत होती, त्याऐवजी आता देश अन्नधान्यात संपूर्णतया स्वयंपूर्ण बनला. ही हरितक्रांती घडवून आणण्याचे श्रेय अनेक नामवंत कृषिशास्त्रज्ञांकडे जाते, पण त्यातही ठळकपणे अग्रभागी उठून दिसणारे नाव डॉ. एम. एस. स्वामीनाथन या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या कृषिशास्त्रज्ञाचे आहे. भारतातील हरितक्रांतीच्या यशस्वी प्रयोगाचे नेतृत्व करणारे ज्येष्ठ कृषिशास्त्रज्ञ यांच्या जीवनकार्याचा स्फूर्तिदायक परिचय नव्या पिढीच्या युवकांना व्हावा यासाठी डॉ. कं. कृ. क्षीरसागर यांनी 'जाणता शेतकरी शास्त्रज्ञ डॉ. स्वामीनाथन' हे पुस्तक वाचकांच्या हाती दिले आहे.

डॉ. क्षीरसागर हे स्वत: कीटकशास्त्रज्ञ आहेत. 'पिकांचे कीटकांच्या उपद्रवापासून संरक्षण करण्याचे उपाय' या संदर्भात त्यांचा शेतीक्षेत्राशी संबंध आला. पुढच्या काळात कृषिजीवन प्रत्यक्ष जगणारे आणि कृषीवर नितांत प्रेम करणारे जिज्ञासू कृषितज्ज्ञ कै. अनंतराव देवकुळे यांच्यामुळे डॉ. क्षीरसागरांना कृषितंत्रज्ञानाची आवड निर्माण झाली. मधमाश्याविषयक एका आंतरराष्ट्रीय परिषदेच्या निमित्ताने डॉ. क्षीरसागर यांचा डॉ. स्वामीनाथन यांच्या कार्यशैलीशी प्रत्यक्ष व्यक्तिगत परिचय झाला. पुढे हा परिचय अधिक दृढ होत गेला.

सध्याच्या जागतिक स्पर्धेच्या युगात भारतीय विद्यार्थी मूलभूत स्वरूपाच्या विज्ञान संशोधनाकडे पाठ फिरवताना दिसतो. तसाच तो भारताला अत्यंत महत्त्वाच्या असलेल्या कृषिविज्ञानाकडे आणि कृषिपूरक तंत्रज्ञान व उद्योग याकडेही पाठ फिरवताना दिसतो. प्रज्ञावान विद्यार्थ्यांना या क्षेत्रात खूप वाव आहे. त्यांना प्रेरणा मिळावी आणि अधिकाधिक



अनुक्रमणिका

युवकांनी कृषिक्षेत्राकडे वळावे यासाठी डॉ. स्वामीनाथन यांचे स्फूर्तिदायी जीवनचरित्र सांगणारे पुस्तक डॉ. क्षीरसागरांनी लिहिले आहे. मूळच्या केरळातील असणाऱ्या एका सुविख्यात प्रतिष्ठित घराण्यात डॉ. स्वामीनाथन यांचा जन्म तामिळनाडूतल्या कुंभकोणम् येथे ७ ऑगस्ट १९२५ रोजी झाला. डॉ. स्वामीनाथन महाविद्यालयीन शिक्षण घेत असतानाच १९४२-४३ चा बंगालचा भीषण दुष्काळ व त्यात लक्षावधी लोकांचे भूकबळी ही घटना घडली. या घटनेचा खोल परिणाम मनावर होऊन डॉ. स्वामीनाथन यांनी शेतीशिक्षण आणि संशोधन यातच आपले सारे आयुष्य व्यतीत करण्याचे ठरवले. या क्षेत्रातील त्यांची पुढची वाटचाल, नेत्रदीपक कार्य आणि राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावर त्यांच्या कार्याचे झालेले कौतुक ही सारी हकीकत मुळात पुस्तकातूनच वाचावयास हवी.

डॉ. क्षीरसागर यांनी डॉ. स्वामीनाथन यांचे जीवनकार्य सांगताना एकेका प्रकरणाला 'बीज अंकुरले', 'रोप वाढले', 'संशोधनाचा बहर', 'सुगंध पसरे दाही दिशांना' अशी अनुरूप नावे दिली आहेत. समाजाचा सर्वांगीण विकास होण्यासाठी अनेकविध मार्गांनी करावी लागणारी वाटचाल यासंबंधीचे डॉ. स्वामीनाथन यांचे विचार व्यक्त करणारी त्यांची एक सविस्तर मुलाखत दिल्लीच्या ह्यूमन स्केप या नियतकालिकाने प्रसिद्ध केली होती. त्या मुलाखतीतील महत्त्वाचे प्रश्न आणि उत्तरे या पुस्तकात "सदाहरित दृष्टी, हरितक्रांती पलीकडची" या मथळ्याच्या स्वतंत्र प्रकरणात दिली आहेत. पुस्तकात शेवटी डॉ. स्वामीनाथन यांच्या देदीप्यमान जीवनदर्शनाचा कालानुक्रम-पट सनांच्या क्रमवारीने दिला आहे. त्यात जन्म, शिक्षण, संशोधन, राष्ट्रीय समित्यांमधील सहभाग, आंतरराष्ट्रीय समित्यांमध्ये सहभाग, त्यांना प्राप्त झालेले वैज्ञानिक सन्मान, राष्ट्रीय पातळीवरचे सन्मान, आंतरराष्ट्रीय स्तरावरचे सन्मान, स्वामीनाथन यांची ग्रंथसंपदा इत्यादींची नोंद आहे.

शेवटी 'एकविसाव्या शतकातील कृषी : स्वप्न सदाहरित क्रांतीचे; जनुकक्रांती, आणि 'पुणे, देशाची सामाजिक राजधानी' अशी तीन परिशिष्टे दिली आहेत. ही तीनही परिशिष्टे डॉ. स्वामीनाथन यांनी केलेल्या विविध भाषणांचा सारांश, या स्वरूपाची आहेत. त्यानंतर शेवटची आठ पृष्ठे चित्रपत्रांची असून त्यांच्यात 'डॉ. स्वामीनाथन यांच्या जागतिक कार्यासंदर्भातील तक्ते व क्षणचित्रे' या स्वरूपाची अनेक चित्रे आहेत.

डॉ. स्वामीनाथन या महान कृषिशास्त्रज्ञाच्या जीवनकार्याची सुबोध ओळख करून देणारे एक आकर्षक, वाचनीय, उद्बोधक चरित्र डॉ. क्षीरसागरांनी वाचकांच्या हाती दिले आहे, त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करणे उचित ठरेल.

**प्रा. प्रभाकर सोवनी**
'बलवंत' ८३७, सदाशिव पेठ
पुणे ४११०३०

■

## 'कविता कल्पनेच्या'

श्रीमती कविता कोठारे यांचा 'कविता कल्पनेच्या' हा पहिलाच काव्यसंग्रह त्यांच्याबद्दल मोठ्या अपेक्षा निर्माण करणारा आहे. एका सामान्य गृहिणीच्या मनातील भावऊर्मी त्यांनी साध्या साध्या शब्दांत गुंफण्याचा प्रयत्न केला आहे. कवितांचे विषयही साधे आहेत. आपल्या काव्यप्रवासात ज्ञानेश्वर, तुकाराम खूप उशिरा भेटले असा उल्लेख कवयित्रीने केला असला तरी त्या दोन महान व्यक्तिमत्त्वांनी त्यांना भारून टाकल्याचे अनेक कवितांतून जाणवते. श्रीमती कोठारे यांच्या साध्या साध्या कवितांतूनही 'उजेडातही चुकती वाटा अंधाराला दोष नको'-'शोधू पाहाता आरशात डावा हात उजव्यात, देव तसाच गुंत्यात माझ्या तुझीया मनात'-'चुकताच ताल थोडा तू सूर सावरावे ओठांत पापणीचे अलगत गीत यावे'-'आयुष्याच्या दोऱ्यात ओवायची अभंगवाणी' अशा दाद घेणाऱ्या काव्यपंक्ती सहजपणे येतात.

'नको', 'मुक्ती',, 'स्मृतिगंध', 'ऋतू', 'जर', 'एक साधा-एक उलटा', 'पहिल्या वेळी' अशा काही कविता लक्षवेधी आहेत. प्रसन्न शैलीच्या कवयित्रीचे हे पहिले पाऊल खूप आश्वासक आहे.

**डॉ. अरविंद लेले**

**कविता कल्पनेच्या**
कवयित्री– श्रीमती कल्पना कोठारे, प्रकाशक– शालिनी कोठारे, जयश्री काकडे

■

## 'काजव्यांच्या खांद्यावर संगिनी'

'काजव्यांच्या खांद्यावर संगिनी' हा श्री. महेंद्र गायकवाड यांचा काव्यसंग्रह वाचकाला अस्वस्थ करणारा आहे. या संग्रहातील लहान लहान मुक्तछंद कविता, कवीच्या मनात घुसमटणाऱ्या वादळांची स्वगतेच आहेत. विसाव्या आणि एकविसाव्या शतकांच्या संधिकाळातील दलित तरुणांच्या मनात खदखदणाऱ्या ज्वालामुखीचे दर्शन श्री. गायकवाडांच्या कवितेतून घडते. चार-सहा वा आठ-दहा ओळींच्या त्या कविता अतिशय अर्थगर्भ आहेत, अल्पाक्षरसामर्थ्याने रसरसलेल्या आणि मनाप्रमाणे मेंदूचाही ठाव घेणाऱ्या आहेत. कवीचे प्रारंभीचे मनोगतही मागोमाग येणाऱ्या स्फोटक कवितांची चाहूल देणारे आहे. नावाप्रमाणेच संगिनींची भेदकता त्यात आहे. विद्रोही कवितेच्या सशक्त प्रवाहाला वाट पुसत निघालेला हा तरुण कवी, भविष्यात आपल्या पावलांचे ठसठशीत ठसे काव्यप्रांतात उमटवील अशी ग्वाही 'काजव्यांच्या खांद्यावरील संगिनी' देत आहेत.

**– डॉ. अरविंद लेले**

**काजव्यांच्या खांद्यावर संगिनी,** कवी– श्री. महेंद्र गायकवाड,
प्रकाशक– शब्दचित्र प्रकाशन, पुणे

## ज्ञानदेवांच्या अक्षरधनातून घेतलेला परतत्त्वाचा वेध
### डॉ. लीला दीक्षित

*('वेध परतत्त्वाचा'– डॉ. सुशीला पाटील, लेखिका पुस्तक प्रकाशन प्रकल्प, प्रथमावृत्ती, १ मे २००२, प्रकाशक डॉ. प्रतिमा इंगोले, पृष्ठे १०३.)*

ज्ञानदेवांचे साहित्यधन हा संशोधकांना कायम कुतूहलाचा आणि आव्हानाचा विषय राहिलेला आहे. अमरावतीच्या डॉ. (श्रीमती) सुशीला पाटील यांनी ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि चांगदेवपासष्टी या ग्रंथांच्या आधारे 'परतत्त्वा'चा वेध घेण्याचा प्रयत्न ग्रंथरूपाने केला आहे. श्रीमती सुशीला पाटील गेली ३०-३५ वर्षे संतसाहित्याच्या क्षेत्रात चिंतन, मनन, संशोधन-लेखन या मार्गाने कार्यरत राहिलेल्या आहेत. ज्ञानेश्वरीतील १३ व्या अध्यायातील एक श्लोकाच्या आधारे त्यांनी विषयाच्या मांडणीला सुरुवात केली आहे.

दिसो परतत्त्व डोळा। पाहो सुखाचा सोहळा।

रिगो महाबोधु सुकाळा। माजि विश्वा।अ. १३/११५६

पसायदान ही ज्ञानदेवांची सुप्रसिद्ध अशी विश्वात्मक भावाची प्रार्थना. वर उद्धृत केलेली ओवी ही पसायदानपूर्व प्रार्थना अशा धारणेतून पुढील सर्व लेखनप्रपंचाची मांडणी झालेली आहे. श्रीमती पाटील यांनी प्रकरणाची नावे अत्यंत सूचक अशी दिली आहेत. (१) सूर्य अधिष्ठिली प्राची (२) माझे असतेपण लोपो (३) दिसो परतत्त्व डोळा (४) बहुरश्मी दिनकरा या चार प्रकरणांतून 'परतत्त्व' या आध्यात्मिक क्षेत्रात महत्त्वपूर्ण असलेल्या तत्त्वाचा मागोवा ज्ञानेश्वरीमध्ये कसा विस्ताराने आला आहे हे लेखिकेने सोदाहरण मांडले आहे.

नववा अध्याय हा ज्ञानदेवांनाही प्रिय होता. 'नवमीचे श्रीकृष्णाचे बोलणे' सर्व अभ्यासकांनाही चिंतन करायला लावील असेच आहे. ज्ञानदेवांनी गीतेला अनंताची वेल म्हटले आणि नववा अध्याय हा त्या अनंतवेलीवर आलेले टवटवीत अनंतपुष्प होय. परतत्त्वस्वरूप भगवंत-भक्ती आणि भक्त यांचे फार अर्थपूर्ण विवेचन लेखिकेनें या अध्यायाविषयी केले आहे. ज्ञानी भक्ताच्या लक्षणात ज्ञानी भक्त अमूर्ताचा पूजक असतो. किंबहुना परमेश्वराला अमूर्त स्वरूपात न्याहाळीत विष्णुमय जग ही स्थिती अनुभवणे ज्ञानी भक्ताचे लक्षण होय. प्रश्न असा येतो, मग ज्ञानदेवही मूर्तीच्या वर्णनात का रमतात? कारण ज्ञानेश्वरीत प्रथम गणेशवंदना आणि शारदावंदना येते. ज्ञानदेवांची गणेशवंदना आणि शारदावंदना याचे अगदी वेगळे मर्म श्रीमती पाटील यांनी उलगडून दाखविले आहे. 'ॐ नमोऽजी आद्या। वेदप्रतिपाद्या । जयजय स्वसंवेद्या। आत्मरूपा।' स्वत:च जाणून घ्यायचे असे हे गणेशाचे रूप अमूर्त रूपामधून प्रथम साकारते. पुढे त्याचे वर्णन अत्यंत लावण्यमय रूपात ज्ञानदेव मांडतात हे खरे! गणेश कसा? तर स्मृती त्याचे अवयव, अष्टादश पुराणे ही मणिभूषणे, साहित्याचा पदबंध हा त्याचा पीतांबर, षड्दर्शनाच्या सहा भुजा, वेदान्ताचा महारसु हा मोदक. बौद्धमताचा खंडितु असा एकदंत अशा प्रतीकात्मक लावण्यमय रूपवर्णनाने आपण मोहून जातो. ही गणेशवंदना

रूपमयी वर्णनातून शेवटच्या चरणापर्यंत येते. 'अकार चरण युगुल। उकार उदर विशाल। मकार महामंडलु। मस्तकाकारे।' म्हणजे परत ॐकाररूपी अमूर्तावरच ती विसावते. अमूर्ताकडून मूर्ताकडे आणि परत अमूर्ताकडे असा हा प्रवास ज्ञानदेवांनी मांडला आहे.

हे जग आनंदमय व्हावे ही एकच आस ज्ञानदेवांना आहे. म्हणून प्रत्येक व्यक्तिमात्राच्या जीवनात परतत्त्वस्पर्शाची दिवाळी यावी असे त्यांना वाटते. ज्ञानदेवांची विशाल आणि सर्वात्मक आस प्रत्यक्ष जीवनाशी श्रीमती सुशीला पाटील यांनी प्रत्ययकारकतेने जोडून दाखवली आहे. त्या म्हणतात,

''कोणत्याही लौकिक वा अलौकिक बाबीत तिचे अंतरंगदर्शन घडविणारे एक आंतरिक परतत्त्व असते. ते आपल्याला सहसा दिसत नाही; ते दिसावे म्हणून मग 'दिसो परतत्त्व डोळा' ही प्रार्थना असते. कारण ते दिसले नाही म्हणजे मग इथल्या लौकिक आणि अलौकिक पातळ्यांवर अनेक प्रकारचे स्थूल अन् सूक्ष्म असे जीवघेणे संघर्ष माजतात. समाजजीवनाचा प्रवाह गढूळ होऊन जातो. मग विठ्ठलपंतांसारख्यांना संन्यासानंतर गृहस्थाश्रम धर्म स्वीकारल्याबद्दल देहान्त प्रायश्चित्त सुनावले जाते. 'परतत्त्व' विसरले गेले की असा अनाचार होत जातो. पापकर्मे वाढीला लागतात. काय करावे आणि काय करू नये याचा विवेक हरवतो. स्वधर्मसूर्य लोप पावतो.' (पृ. ११, प्रस्तावना)

'दो होटी एक बोलणे' आणि पुढील दोन प्रकरणांत अमृतानुभव आणि चांगदेव पासष्टी यांच्या आधारे 'परतत्त्व' या तत्त्वाचा विकास सुशीला पाटील यांनी नोंदवला आहे. वस्तुत: ज्ञानेश्वरीपेक्षाही अमृतानुभवात या परतत्त्वाचा जास्त ठसठशीतपणाने आणि उत्कटत्वाने विचार ज्ञानदेवांनी मांडला आहे. त्याचा ओझरताच भाग येथे नोंदवला गेला आहे. अमृतानुभवाचे आधारे स्वतंत्र ग्रंथ व्हावा, असा हा विषय आहे.

श्रीमती सुशीला पाटील यांनी ग्रंथात नोंदविलेल्या दोन गोष्टींमध्ये सर्व वाचक अनुकूल मताचे असतील असे वाटत नाही. त्या म्हणतात, 'सांसारिक माणसांच्या अनुभवांना नश्वरतेची किनार असते. ज्ञानदेवांच्या अनुभवासारखे ते अमृतानुभव नसतात. ते मृतानुभव असतात. काळ, काम, वेगाच्या चौकटीतले ते असतात.' (पृ. ५)

सारेच मानवी अनुभव असे म्हणता येणार नाहीत. उत्कट कलानुभव कालनिबद्ध नसतो. दिव्य संगीताचा अनुभव अंतरीचा दिवा सतेज करतो. त्या प्रकाशात माणसाला परतत्त्वाने भान निर्माण होते.

श्रीमती पाटील यांचा दुसरा उल्लेख असाच विचारार्ह आहे. 'जनसामान्यांच्या कळवळ्यापोटी ही लेखनकामाठी आहे. त्याकरिता त्यांनी गीतार्थाचे मिस – निमित्त त्यांनी शोधले आहे. ज्या गीताग्रंथावर भाष्य करायचे त्या आधारग्रंथालाच त्यांनी असे दुय्यम स्थान दिले आहे.' (पृ. ६)

ज्ञानेश्वरी हे गीताभाष्यच आहे. गीतेमध्ये आलेले अश्वत्थाचे रूपक, ज्ञानी भक्ताची लक्षणे, विश्वरूपदर्शन, दैवी संपद्, आसुरी संपद्, भगवंताच्या विभूती, ज्ञानोत्तर भक्ती, कर्मयोग, सांख्य योग, भक्तियोग, ही सर्व मांडणी गीतेचीच आहे. तेथे ज्ञानेश्वर गीतेला

दुय्यम लेखतात असे म्हणता येणार नाही. उलट ज्ञानदेवांनी आपल्या प्रातिभप्रज्ञेने गीतार्थाला जास्त उंच नेले आहे, जास्त स्पष्ट केले आहे. हे करत असता, 'साहित्य सोनियाच्या खाणी' सहजपणे उघडल्या आहेत.

या दोन थोड्या मतभिन्नता असलेल्या गोष्टी सोडल्या तर श्रीमती सुशीला पाटील यांचा 'वेध परतत्त्वाचा' हा ग्रंथ 'निका जाहलासे' असंच म्हणायला हवं. ग्रंथावरील मुखपृष्ठ स्वयंप्रकाशी सूर्याच्या चित्राने सूचक बनले आहे, याचीही नोंद घ्यावीशी वाटते.

**– डॉ. लीला दीक्षित**
'ध्रुव' ४९/२ सहजानंद,
कोथरूड, पुणे ४११ ०२९.

❑

---

## स्वागत

**शिक्षणवेध,** संपा. शांता मालेगावकर/वसुधा परांजपे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृ. २८८
**ब्रेनव्हेवज्,** माधुरी शानभाग, राजहंस प्रकाशन, पुणे, पृ. ९६
**स्वरयज्ञ,** संपा. अ. पां. देशपांडे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृ. १८२
**करिअर कसं निवडावं?** श्रीराम गीत, राजहंस प्रकाशन, पुणे, पृ. ११०
**छोट्यांचे मोठेपण,** नामा कांबळे, सायली प्रकाशन, सोलापूर, पृ. १००
**नितळ चंद्र,** सुहासिनी सुरेश, सखया प्रकाशन, औरंगाबाद, पृ. ५४
**मी हा असा,** म. पां. भावे, विवेक भावे, मुंबई, पृ. ११२
**लग्नानंतर,** मेधा राजहंस, उन्मेष प्रकाशन, पुणे, पृ. १३०
**पक्षितीर्थ,** वसुधा पाटील, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृ. १३०
**आम्ही चित्पावन,** म. श्री. दीक्षित, नीलकंठ प्रकाशन, पुणे, पृ. १६०
**लास्ट आयटेम,** श्याम कुदळे, कीर्ती प्रकाशन, कोल्हापूर, पृ. १२३
**मोठ्यांच्या छोट्या गोष्टी,** श्याम कुदळे, लोकसाहित्य प्रकाशन, पृ. २०
**लुटारू बनला धर्मगुरू,** श्याम कुदळे, लोकसाहित्य प्रकाशन, पृ. २४
**वीर बालक,** श्याम कुदळे, लोकसाहित्य प्रकाशन, पृ. ४०
**किमयागार,** एम मुकुंदन, साहित्य अकादमी, मुंबई, पृ. ३४१
**बसवेश्वर,** एच. तिरुपेंद्रस्वामी, साहित्य अकादमी, मुंबई, पृ. ५१
**स्त्रियांची आत्मचरित्रं-स्त्रीवादी शोध,** डॉ. शोभा पाटील, मल्हार प्रकाशन, पुणे, पृ. ४०१
**सांज फुटीचे देणे,** राम कदम, शारदा प्रकाशन, जळगाव, पृ. ८४

## आवाहन

सप्रेम नमस्कार,

मागील अंकात महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शताब्दीच्या दृष्टीने सर्व शाखांना आणि अनुषंगाने सर्व सदस्यांना काही उपयुक्त सूचना आणि मातृभाषेच्या विकासाच्या दृष्टीने काही अभिनव कल्पना परिषदेकडे पाठविण्याविषयी आवाहन केले होते. काही प्रमाणात त्याला प्रतिसादही मिळत आहे. परंतु त्या साऱ्यांच्या कार्यवाहीसाठी लागणारा निधी उभारणे ही सर्वांत प्राथमिक गरज आहे. परिषदेचे हे त्रैमासिक जवळजवळ आठ हजार सदस्यांना सातत्याने पाठविले जाते. त्याच्या निर्मितिखर्चात तसेच वितरणखर्चात दिवसेंदिवस प्रचंड प्रमाणात वाढ होत आहे. शासकीय अनुदानातही कपात होत आहे. तरीही एका व्रतभावनेने परिषद हा अंक दर तीन महिन्यांनी नियमितपणे प्रकाशित करीत आहे. त्याला अनेक हातांची आणि मनांची आता आवश्यकता आहे. त्यासाठी प्रकाशन व्यवसाय, अर्थव्यवसाय, सामाजिक-सांस्कृतिक संस्था यांच्याशी संबंधित सदस्यांनी या साहित्यिक ठेवा जपणाऱ्या त्रैमासिकासाठी शुभेच्छा जाहिराती देऊन आपला खारीचा वाटा उचलून या सेतुबंधनाच्या कार्यात सहभागी व्हावे, अशी आग्रहाची विनंती आहे.

**रवीन्द्र भट,** प्रमुख कार्यवाह

## उदार देणगी

दि. २ एप्रिल नववर्षाच्या शुभारंभालाच परिषदेच्या दृष्टीने एका शुभकार्याचा प्रारंभ झाला. साहित्य परिषदेच्या एक ज्येष्ठ सदस्या आणि सामाजिक आणि सांस्कृतिक कार्याविषयी आस्था असलेल्या कीर्तनसंजीवनी **श्रीमती पुष्पलता रानडे** यांनी परिषदेच्या अतिथी निवासाच्या नूतनीकरणासाठी आपले पती **कै. राजाभाऊ रानडे** यांच्या स्मरणार्थ रु. ५,०००००/- (रु. पाच लाख) ची देणगी देण्याचे मान्य केले आणि या देणगीचा रु. २,०००००/- (रु. दोन लाख) पहिला हप्ता परिषदेकडे सुपूर्त केला. या बहुमूल्य देणगीबद्दल परिषदेचे सर्व पदाधिकारी आणि कार्यकर्ते त्यांचे ऋणी आहेत.

❑

# कार्यवृत्त म.सा.प., पुणे
## (१ जानेवारी २००३ ते ३१ मार्च २००३)

**१) १८ जाने. २००३– वि. द. घाटे स्मृतिदिन :**

यंदाचा वि. द. घाटे स्मृतिदिन नेहमीपेक्षा वेगळ्या प्रकारे आयोजित करण्यात आला.

वि. द. घाटे यांच्या कन्या व ज्येष्ठ कवयित्री डॉ. अनुराधा पोतदार यांचा, ७५ व्या वाढदिवसानिमित्त परिषदेतर्फे शाल व पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. प्रास्ताविक डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले व श्रीमती पोतदार यांचा सत्कार परिषदेच्या कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांच्या हस्ते करण्यात आला. त्यांनी या निमित्ताने ज्येष्ठ कवयित्री डॉ. अनुराधा पोतदार यांच्याविषयी मनोगत व्यक्त केले. तसेच 'शब्दमित्र' संस्थेच्या श्रीमती अंजली कुलकर्णी यांनीही बाईंना शाल अर्पण करून त्यांच्याविषयी आपल्या भावना व्यक्त केल्या. यानंतर डॉ. प्रियदर्शन पोतदार व श्रीमती यशोधरा साठे यांनी या निमित्ताने कवी दत्त, कवी वि. द. घाटे, कवयित्री अनुराधा पोतदार यांच्या व आपल्या काही काव्यरचना सादर केल्या. प्रारंभी कार्यवाह श्रीमती नंदा सुर्वे यांनी वि. द. घाटे यांच्या दोन कवितांचे वाचन केले. कार्यवाह श्री दीपक करंदीकर यांनी या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले व आभार मानले.

**२) २० जाने. २००३–**

थोर लेखक कै. वि. स. खांडेकर यांचा जन्मदिन ११ जानेवारी रोजी असतो. पण यंदा ७६ वे साहित्य संमेलन १०/११/१२ जानेवारी रोजी कऱ्हाड येथे साजरे झाल्यामुळे यंदाचा खांडेकरांचा जन्मदिन २० जाने रोजी साजरा करण्यात आला. या वेळी डॉ. न. म. जोशी यांचे 'वि. स. खांडेकरांचे समाजचिंतन' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक व आभारप्रदर्शन प्रमुख कार्यवाह रवींद्र भट यांनी केले.

**३) २१ जाने. २००३– केशवसुत स्मृतिदिन**

यंदा केशवसुत स्मृतिदिन ७ नोव्हेंबर २००२ रोजी ऐन दिवाळीत आल्यामुळे साजरा होऊ शकला नाही. तो कार्यक्रम २१ जाने २००३ रोजी म. सा. परिषद व दलित साहित्य परिषदेच्या संयुक्त विद्यमाने एक बहारदार कविसंमेलन आयोजित करून साजरा करण्यात आला.

दलित साहित्य परिषदेचे अध्यक्ष श्री. बाळ आल्हाट ह्यांनी कविसंमेलनाचे अध्यक्षस्थान भूषविले. रूपाली अवचरे व दीपक करंदीकर यांनी कविसंमेलनाचे व एकूण कार्यक्रमाचे

सूत्रसंचालन केले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. निमंत्रित कवी म्हणून दुर्योधन अहिरे, धर्मराज निमसरकर, गोरख भालेराव, हर्षानंद सोनवणे, रामकृष्ण वाघमारे, घनश्याम धेंडे, विजयकुमार गवई, सूर्यकांत भोसले, अरुण कांबळे इत्यादींनी आपल्या कविता सादर केल्या. शेवटी दुर्योधन अहिरे यांनी आभार मानले.

**४) २८ फेब्रुवारी २००३– विज्ञानदिवस व्याख्यान**

म. सा. परिषद आणि मराठी विज्ञान परिषद, पुणे शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने मराठी विज्ञान परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्रभाकर देवधर यांचे 'आधुनिक विज्ञान प्रगती व सामाजिक बदल' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. श्री म. ना. गोगटे यांनी व्याख्यात्यांचा परिचय करून दिला. दीपक करंदीकर यांनी आभार मानले. उपस्थित श्रोत्यांनी प्रश्नोत्तरांच्या कार्यक्रमात सहभाग घेतला.

**५) ११ मार्च २००३– कुसुमाग्रज स्मृतिदिनानिमित्त खास कार्यक्रम :**

प्रसिद्ध निवेदिका व अभिनेत्री विनीता आपटे यांनी कुसुमाग्रजांच्या साहित्याचा वेध घेणारा स्मृतिगंध हा विशेष कार्यक्रम सादर केला. कुसुमाग्रजांचे बंधू प्राचार्य के. रं. शिरवाडकर यांचे या प्रसंगी पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. गंगाधर महांबरे, श्रीमती टिल्लू, परिषदेचे अन्य पदाधिकारी व श्रोत्यांची भरघोस उपस्थिती, यामुळे या कार्यक्रमाची रंगत वाढली. दीपक करंदीकर यांनी आभार प्रदर्शन केले. डॉ. जोगळेकरांनी प्रास्ताविक केले.

**६) २० मार्च २००३– बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन :**

थोर कवी, लेखक, समीक्षक कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त 'मर्ढेकरांची कादंबरी' या विषयावर डॉ. रेखा इनामदार-साने यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले तर आभार दीपक करंदीकर यांनी मानले.

**७) २४ मार्च २००३– विशेष श्रद्धांजली सभा :**

विख्यात लेखिका गौरी देशपांडे व कविवर्य सुरेश भट यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या अध्यक्षतेखाली शोकसभा आयोजित करण्यात आली.

**दीपक करंदीकर**
स्थानिक कार्यवाह, म.सा.प., पुणे.

❑

ठाणे जिल्हा साहित्य संमेलन ३० मार्च रोजी झाले तसेच सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन ३१ मे व १ जून रोजी झाले. या संमेलनांचे वृत्त पुढील अंकी देण्यात येईल.

# पारितोषिके जाने., फेब्रु., मार्च २००३

❑

**१९ जानेवारी २००३**

**कै. चिं. वि. जोशी** यांच्या स्मृतिदिनानिमित्त **कॉंटिनेंटल प्रकाशन** पुरस्कृत दोन पुरस्कार दिले जातात. उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकाला देण्यात येणारा रु. १५००/- चा पुरस्कार या दिवशी **श्री. शिरीष कणेकर** यांच्या **'लगाव बत्ती'** या पुस्तकास व त्याच पुस्तकाच्या प्रकाशकाला दिलीप काळे (**दिलीप प्रकाशन,** मुंबई) यांना रु. १०००/- चा पुरस्कार देण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी मंगला गोडबोले होत्या. परीक्षकांच्या वतीने डॉ. पी. एन्. कुंभारे यांचे भाषण झाले. डॉ. सुवर्णा दिवेकर या सहपरीक्षक होत्या. नंदा सुर्वे यांनी प्रास्ताविक केले तर डॉ. शंतनु चिंधडे यांनी आभार मानले.

**२७ फेब्रुवारी २००३ कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक**

कॉंटिनेंटल प्रकाशनाने पुरस्कृत केलेली दोन पारितोषिके उत्कृष्ट कवितासंग्रहाच्या कवीस (रु. १५००) आणि प्रकाशकास (रु. १०००) कवी कुसुमाग्रज यांच्या जन्मदिनी दिली जातात. या वर्षी **'आणि तरीही मी'** या कवितासंग्रहासाठी **कवी सौमित्र** (किशोर कदम) यांना व **पॉप्युलर प्रकाशन, मुंबई** यांना ही पारितोषिके कवयित्री **प्राचार्य डॉ. अश्विनी धोंगडे** यांच्या हस्ते प्रदान करण्यात आली. परीक्षकांतर्फे डॉ. सुषमा जोगळेकर यांचे भाषण झाले. प्रमुख कार्यवाह रवीन्द्र भट यांनी प्रास्ताविक केले तर कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**८ मार्च २००३ शरदबाबू पुरस्कार**

ज्येष्ठ लेखिका **ज्योत्स्ना देवधर** यांनी पुरस्कृत केलेला थोर भारतीय लेखक **शरद्चंद्र चट्टोपाध्याय** यांच्या नावे ज्येष्ठ लेखिकेला हा रु. ५०००/- चा पुरस्कार देण्यात येतो. या वर्षी या पुरस्कारासाठी प्रसिद्ध लेखिका आणि समीक्षक **डॉ. सरोजिनी वैद्य** यांची निवड करण्यात आली. ज्येष्ठ समीक्षक प्रा. रा. ग. जाधव यांच्या हस्ते हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले.

**९ मार्च २००३ महाराष्ट्र कवी यशवंत पुरस्कार**

**कविवर्य यशवंत** यांच्या जन्मदिनी उत्कृष्ट कवितासंग्रहाला रु. १०००/- चा कवी यशवंत पुरस्कार दिला जातो. या वर्षी **डॉ. श्रीनिवास सिरास** यांना **'पायाखाली हिरवळ'** या कवितासंग्रहाबद्दल हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. अध्यक्षस्थानी **डॉ. द. दि. पुंडे**

होते. परीक्षकांच्या वतीने **हेमंत जोगळेकर** यांचे भाषण झाले. सहपरीक्षक **डॉ. सुषमा जोगळेकर** होत्या. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. नंदा सुर्वे यांनी प्रास्ताविक केले.

**नंदा सुर्वे**
कार्यवाह

## उल्हासनगर शाखा

म.सा.प. उल्हासनगर शाखेतर्फे दि. २ फेब्रुवारी २००३ रविवार रोजी दु. ४ वा. 'हसरा गजरा' हा कार्यक्रम संपन्न झाला.

विनोदी, आकर्षक व लक्षवेधी 'हसरा गजरा' या कार्यक्रमासाठी श्री. कमलाकार वैशंपायन, श्री. राजा मयेकर, श्री. जयंत ओक, श्री. अरविंद शर्मा हे सर्वपरिचित व ख्यातिप्राप्त कलाकार उल्हासनगर शहरात प्रथमच आले आणि सर्व रसिक श्रोत्यांचे मन जिंकून गेले.

आपल्या जीवनात विनोदाचे महत्त्व व विनोदाने जीवन कसे आनंदी बनून जाते आणि कशा प्रकारे सहज विनोद साधला जातो हे त्यांनी उदाहरणांद्वारे छोटे-छोटे किस्से सांगून पटवून दिले. आपल्या प्रत्यक्ष अनुभवातून विनोदाची निर्मिती कशी केली व सहजपणे विनोद कसे घडत असतात हे श्री. कमलाकार वैशंपायन यांनी सहज व सोप्या पद्धतीने सांगून रसिकांची मने वश केली.

बाकी इतर कलाकारांनीही आपआपल्या कौशल्याने रसिकांना खूष करून टाकले.

कार्यक्रमाच्या सुरुवातीला डॉ. श्रीकांत देशपांडे, अध्यक्ष उल्हासनगर शाखा यांनी पाहुण्यांचे स्वागत करून प्रास्ताविक केले. प्रमुख पाहुण्यांचा परिचय सौ. सुलभा परांजपे यांनी करून दिला.

सार्वजनिक मित्रमंडळाचे सभागृह सौ. परांजपे यांनी उपलब्ध करून दिले आणि या कार्यक्रमाचे आयोजनही त्यांनी केले होते. श्रीमती शारदा लोटलीकर यांनी सर्वांचे आभार मानले.

**श्री. वि. देशपांडे**
अध्यक्ष,

## नाशिक शाखा

### सन २००२-२००३ चा कार्यवृत्तांत

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नाशिक शाखेने सन २००२-२००३ वर्षात शुद्धलेखन वर्गाचा महत्त्वपूर्ण उपक्रम राबविला. दिनांक २७ जुलै, २००२ ते २५ ऑगस्ट, २००२ ह्या वर्गाचे आयोजन करण्यात आले. प्रा. डॉ. भास्कर गिरिधारी, श्री. प्रल्हाद कुलकर्णी, श्री. द. स. सहस्रबुद्धे, श्री. सु. रा. म्हाळणकर ह्यांनी मराठी भाषा, शुद्धलेखन विषय व्याप्ती,

मराठी वर्णमाला, विरामचिन्हे, मुद्रित शोधन, शुद्धलेखनातले सामान्य नियम आणि बारकावे, वाक्यरचनेची शुद्धता ह्या बाबींवर सविस्तर मार्गदर्शन केले. ह्या वर्गास साठ अभ्यासूंची उपस्थिती होती. शुद्धलेखन वर्गाचा समारोप आणि प्रमाणपत्र वितरण मा. डॉ. गं. ना. जोगळेकर, पुणे ह्यांच्या हस्ते झाले. त्यांनी शिबिरार्थींना मार्गदर्शन करून प्रमाणपत्रांचे वितरण केले. ह्या वर्गाच्या आयोजनात कार्यवाह रेखा भांडारे आणि सौ. श्रेयसी रहाळकर ह्यांनी विशेष परिश्रम घेतले. प्रतिवर्षी असे वर्ग घेण्याविषयी शिबिरार्थींनी सूचना केली.

दिनांक २५/१/०३ रोजी नाशिकमधील तीन प्रथितयश लेखकांच्या नव्या पुस्तकांचा प्रकाशन समारंभ 'संवाद' वाङ्मय चळवळीच्या सहकार्याने घेण्यात आला. ह्यात मनोहर शहाणे ह्यांच्या 'तो जो कोणी एक' ह्या एकांकिका संग्रहावर डॉ. रमेश वरखेडे, डॉ. चंद्रकांत वर्तक ह्यांच्या 'भ्रमणचित्रे' ह्या प्रवासवर्णनावर, श्री. भरद्वाज रहाळकर आणि चंद्रकांत महामिने ह्यांच्या 'हे असंच चालायचं' ह्या एकांकिकासंग्रहावर श्री. किशोर पाठक ह्यांनी आपले विचार मांडले.

कविवर्य सुरेश भटांच्या दुःखद निधनानंतर नाशिकमधील विविध संस्थांच्या वतीने श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. त्यात किशोर पाठक, प्रदीप निफाडकर, आदम मुल्ला, वेदश्री थिगळे ह्यांनी सुरेश भटांच्या विविध आठवणी सांगितल्या आणि त्यांना श्रद्धांजली अर्पण केली.

**किशोर पाठक**
कार्याध्यक्ष

## डोंबिवली शाखा

**शुक्रवार १४ फेब्रुवारी २००३**

सुप्रसिद्ध सर्जन डॉ. व्ही. एन. श्रीखंडे यांचे 'शल्यकौशल्य : शास्त्र व कला' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले. या वेळी सौ. पद्मावती जावळे, सौ. सुषमा लिमये, सौ. माधवी घारपुरे, डॉ. शुभदा खटावकर आणि लोकशाहीर शेलार यांचा त्यांना मिळालेल्या विविध पुरस्कारांबद्दल सत्कार करण्यात आला.

**द. शं. रानडे**
कार्यवाह

## जळगाव शाखा

**१) मंगळवार दि. २८ जाने. ०३**

भास्करराव चव्हाण यांच्या 'आहुती' कथासंग्रहाचे प्रकाशन नूतन मराठा महाविद्यालयाच्या सभागृहात डॉ. गं. ना. जोगळेकर अध्यक्ष अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ पुणे यांच्या हस्ते करण्यात आले. या निमित्ताने डॉ. जोगळेकर यांनी परिषद कार्यकर्त्यांशी चर्चा केली. परिषदेचे अध्यक्ष प्रा. नारायण शिरसाळे यांनी प्रमुख अतिथींचे स्वागत व प्रास्ताविक



अनुक्रमणिका

केले. प्रमुख अतिथी कवी डी. बी. जगत्पुरिया, प्रा. सुनील गरूड व भास्कर चव्हाण यांनी मनोगत व्यक्त केले. प्रा. दिनेश पाटील, कार्याध्यक्ष यांनी सूत्रसंचालन केले व प्रा. पी. बी. चौधरी यांनी आभार मानले. साहित्यिक धों. वे. जोगी, चंद्रकांत भंडारी, प्रा. शरदचंद्र छापेकर यांची उपस्थिती होती.

**२) बुधवार ५ फेब्रुवारी ०३**

बहादरपूर ता. पारोळा येथे म.सा.प. शाखा जळगाव व तुळशीराज प्रकाशन, महाळपूर यांच्या विद्यमाने परिषदेचे सदस्य प्रा. भगवान पाटील लिखित 'श्रमसाफल्य' या कथासंग्रहाचे प्रकाशन धुळे येथील साहित्यिक प्रा. मु. ब. शहा यांच्या हस्ते करण्यात आले. 'कविता रती'चे संपादक प्रा. पुरुषोत्तम पाटील कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होते. प्रमुख अतिथी म्हणून डॉ. बापूराव देसाई, श्री. सुभाष सोनवणे, संपादक दै. देशदूत, श्री. जयवंतराव ठाकरे, माजी आमदार, श्री. नारायण शिरसाळे, प्रा. दिनेश पाटील व स्थानिक पदाधिकारी व रसिकांची उपस्थिती होती. प्रा. उत्तम सुरवाडे म.सा.प. सदस्य यांनी सूत्रसंचालन केले.

**प्रा. नारायण शिरसाळे**
**अध्यक्ष**

## इचलकरंजी शाखा

नवीन वर्षात ४ जाने. २००३ रोजी म.सा.प. इचलकरंजीतर्फे आयोजित साहित्यिक बैठकीमध्ये 'मैत्री' ह्या विषयावर चर्चा आणि गप्पांचा कार्यक्रम झाला. ह्या वेळी कार्यक्रमात, चर्चेत म.सा.प. सदस्य तसेच मनोरंजन मंडळ युवक विभागाचे युवक-युवती सदस्य सहभागी झाले होते. सहभागी झालेल्या सदस्यांनी मैत्री ह्या विषयानुरूप आठवणी, किस्से व कविता सादर केल्या.

फेब्रुवारी महिन्यातील साहित्यिक बैठक दि. १/२/२००३ रोजी 'कथाकथन' ह्या विषयावर घेण्यात आली. ह्या वेळी कथाकथन कसे करावे, ह्यावर चर्चा करण्यात आली. बैठकीत म.सा.प. सदस्य आणि मनोरंजन मंडळ सदस्य उपस्थित होते. श्री. काशिनाथ जगदाळे ह्यांनी ह्या वेळी दोन कथा सांगितल्या.

दिनांक २२, २३, व २४ फेब्रुवारी २००३ असे तीन दिवस इचलकरंजी येथे राज्यस्तरीय साहित्य अभिवाचन स्पर्धा रंगवर्धन आणि मनोरंजन मंडळ ह्यांच्या सहकार्याने घेण्यात आल्या. ह्यामध्ये राज्यभरातून मराठी साहित्य वाचनासाठी २० संघांनी सहभाग घेतला होता. शाखेच्या आजीव सदस्या व निमंत्रित शाखा कार्यकारिणी सदस्या सौ. चित्कला कुलकर्णी ह्यांनी स्पर्धेत सहभाग घेतला.

कविश्रेष्ठ कुसुमाग्रज जन्मदिनानिमित्त इचलकरंजीमध्ये दि. २७ व २८ फेब्रुवारी २००३ रोजी आयोजित मराठी दिन उत्सवात मनोरंजन मंडळ व पं. बाळकृष्णबुवा संगीत साधना मंडळ ह्या संस्थांना, शाखेने संयोजन सहकार्य केले. नवरसांवर आधारित 'मायबोली नवरस'

ह्या कार्यक्रमाच्या सादरीकरणात शाखेचे संजय होगाडे, सौ. चित्कला कुलकर्णी, सौ. सायली होगाडे, विजय जगताप, इत्यादी सदस्य सहभागी झाले होते. दुसऱ्या दिवशी रुद्रेश्वर-पणजी ह्या संस्थेच्या दोन एकांकिका सादर करण्यात आल्या. दोन्ही दिवस कार्यक्रमांना म.सा.प. सदस्य व निमंत्रित मोठ्या संख्येने उपस्थित होते.

शनिवार ८ मार्च २००३ रोजी नेहमीप्रमाणे साहित्यिक बैठक आयोजित करण्यात आली. कुसुमाग्रजांच्या साहित्याचे रसग्रहण असा विषय ह्या बैठकीप्रसंगी घेण्यात आला होता. बैठकीत शाखेचे अध्यक्ष ॲड. सत्यनारायण ओझा ह्यांनी कुसुमाग्रज-साहित्याबद्दल विचार मांडले. मध्यवर्ती पुणे म.सा.प.च्या कार्यकारिणी सदस्या सौ. वैशाली नायकवडे ह्यांनी कुसुमाग्रजांच्या काही कविता सादर केल्या. शाखेचे कार्यकारिणी सदस्य सदानंद उकिडवे ह्यांनी कुसुमाग्रजांच्या नाटकातील काही प्रवेशांचे वाचन केले.

**राजन मुठाणे,**
कार्याध्यक्ष

## घोडेगाव शाखा

### दि. १ जाने. २००३ उद्घाटन समारंभाचे वृत्त

'अनेक विषयांचा अभ्यास केल्याशिवाय समर्थ साहित्यिक होऊ शकत नाही' असे प्रतिपादन प्राचार्य शिवाजीराव भोसले यांनी येथे केले.

घोडेगाव ता. आंबेगाव येथील महाराष्ट्र साहित्य परिषद शाखेच्या उद्घाटनप्रसंगी प्राचार्य भोसले प्रमुख पाहुणे म्हणून बोलत होते. या वेळी महाराष्ट्र साहित्य परिषदेचे प्रमुख कार्यवाह रवीन्द्र भट, परीक्षा विभाग प्रमुख कल्याण इनामदार, नंदा सुर्वे, दीपक करंदीकर, भिवंडी महानगरपालिकेचे आयुक्त अभिमन्यू काळे, माजी आमदार बी. डी. (अण्णा) काळे, आंबेगाव तालुका, विद्या विकास मंडळाचे अध्यक्ष दत्तात्रय कृष्णाजी पाटील काळे, विघ्नहर सहकारी साखर कारखान्याचे संचालक दत्तात्रय किसनराव पा. काळे, घोडेगाव साहित्य परिषदेचे अध्यक्ष डॉ. पुरुषोत्तम काळे, कार्यवाह विश्वासराजे काळे आदी उपस्थित होते.

ग्रामीण भागात साहित्य परिषदेची शाखा स्थापन झाल्याबद्दल प्रा. भोसले यांनी कार्यकर्त्यांचे कौतुक केले. ते म्हणाले, "साहित्याचा प्रसार होण्यासाठी डॉक्टर, पत्रकार, वकील, अभिनेते अशा उच्चशिक्षितांनी नेतृत्व करावे. वक्ता होणे सोपे आहे; परंतु प्राध्यापक व डॉक्टर होणे अवघड आहे. प्रत्येकाने आपल्या शाखेचा सांगोपांग अभ्यास करावा. माणसाने निराश होऊ नये. मतभेद होणार नाहीत अशी कृती करावी. मराठी भाषेचा रोज दोन तास तरी अभ्यास करावा, असे त्यांनी भाषणात सांगितले.

म.सा.प.चे प्रमुख कार्यवाह रवीन्द्र भट म्हणाले, "साहित्य परिषदेच्या कार्याचा ग्रामीण भागात प्रसार होणे गरजेचे आहे. एकसंध समाजासाठी भाषेची गरज आहे." या शाखेसाठी सर्व प्रकारची मदत शासनस्तरावर देण्यासाठी प्रयत्नशील राहू, असे श्री. अभिमन्यू काळे यांनी सांगितले.



अनुक्रमणिका

व्यासपीठाची सजावट सौ. नेहा नांगरे यांनी केली. या कार्यक्रमाची प्रायोजक घोडेगाव नागरी सहकारी पतसंस्था होती. त्यासाठी विशेष सहकार्य पतसंस्थेचे अध्यक्ष बाळासाहेब काशिनाथ काळे यांचे होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन डॉ. रमा काळे यांनी केले. आभार प्राचार्य इंद्रजित जाधव यांनी मानले.

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
अध्यक्ष

## शहापूर शाखा (जि. ठाणे)

नववर्ष स्वागताच्या निमित्ताने नववर्षाच्या पूर्वसंध्येला कै. व. पु. काळे लिखित 'दुर्दैवी शर्मिला', 'बदली' व 'बावकरपंत' या कथांचा कथाकथनाचा कार्यक्रम प्रा. प्रशांत देशमुख (रायगड) यांनी आपल्या ओजस्वी व खणखणीत भाषेत सादर केला. 'दुर्दैवी शर्मिला' ऐकताना श्रोतृवर्ग धीरगंभीर होता, परंतु त्यानंतर सादर केलेल्या विनोदी कथाकथनाने प्रेक्षकवर्ग व प्रामुख्याने महिला वर्ग हास्यकल्लोळात बुडून गेला.

तत्पूर्वी शहापूर शाखेचे अध्यक्ष श्री. भगवान धर्मे यांनी श्री. प्रशांत देशमुख यांचे शाल-श्रीफळ देऊन स्वागत केले व उपस्थितांचेही स्वागत करून धन्यवाद दिले. प्रास्ताविकांत शाखेचे कार्याध्यक्ष श्री. सु. पां. देशमुख यांनी गेल्या जुलै २००१ मध्ये सुरू केलेल्या शाखेची तसेच पहिला वर्धापन जुलै २००२ मध्ये ज्येष्ठ साहित्यिक मा. दाजी पणशीकर यांचे व्याख्यानाची आठवण श्रोतृवर्गास करून दिली. टी.व्ही. सिरीयल संस्कृती व पाश्चात्त्य संस्कृतीचे आपल्यावरील अतिक्रमण रोखण्याचा पुनरुच्चार केला.

सर्वसामान्य जनतेमध्ये साहित्याची गोडी, आवड निर्माण करण्याचा 'कऱ्हाड' येथील साहित्य संमेलनातील संदेश आम्ही घेऊन आलो आहोत, म्हणूनच शहापूरसारख्या ग्रामीण भागात आम्ही उपक्रम राबवीत आहोत. परंतु त्यासाठी सर्व सुशिक्षितांनी परिश्रमपूर्वक सहभाग घ्यावा असे आवाहनही त्यांनी केले. त्यासाठी शहरी संपन्न शाखांनी साहित्य

### आभार

मे. किर्लोस्कर होल्डिंग्ज ट्रस्ट पुणे ७ या संस्थेने अलीकडेच म. सा. परिषदेस रुपये पस्तीस हजाराची देणगी दिली आहे. या देणगीचा विनियोग परिषदेने एका संगणक संचाच्या खरेदीसाठी केला आहे. या संगणक संचामुळे परिषदेची विशेष सोय झाली आहे. श्री. अरुण किर्लोस्कर यांच्या या उदार देणगीबद्दल परिषदेतर्फे कृतज्ञता व्यक्त करणे आमचे कर्तव्य आहे. ही देणगी मिळण्यासाठी डॉ. अरविंद लेले यांनी विशेष प्रयत्न केले. त्यांचेही आभार.

— कार्याध्यक्ष

संमेलनातील थोडा फार वाटा देणगी रूपाने ग्रामीण शाखांसाठी मिळावा असा प्रस्ताव 'कऱ्हाड' साहित्य संमेलनात दिल्याची माहिती श्री. सूर्यकांत देशमुख यांनी दिली.

कार्यवाह श्री. गं. प. पंडित यांनी खाडे विद्यालयाचे तसेच इतर मदतनीसांचे व उपस्थितांचे मन:पूर्वक आभार मानले.

**गं. प. पंडित**, कार्यवाह

## धुळे शाखा

महाराष्ट्र साहित्य परिषद धुळे जिल्हा शाखेने गरुड वाचनालय, धुळे यांच्या सहकार्याने पुढील कार्यक्रमाचे आयोजन केले.

**दि. २६ फेब्रुवारी २००३ :** 'स्वातंत्र्यवीर सावरकर आत्मार्पण दिना'च्या निमित्ताने धुळे येथील सुप्रसिद्ध इतिहास संशोधक प्रा. डॉ. जी. बी. शहा यांचे 'स्वा. सावरकर आणि खानदेशमधील स्वातंत्र्य चळवळ' या विषयावर उद्‌बोधक, माहितीपूर्ण व्याख्यान झाले. स्वा. सावरकरांनी धुळे व खानदेश परिसरात कधी व कोणत्या दिवशी व्याख्याने दिली याची माहिती त्यांनी दिली. आपल्या व्याख्यानातून स्वा. सावरकरांच्या चतु:सूत्रीचे (अस्पृश्योद्धार, भाषालिपी शुद्धता, बुद्धिप्रामाण्यवाद, राजकीय-सामाजिक मुक्ती) विवेचन करून त्यानुसार त्या वेळी खानदेशातील बाळूभाई मेहता, गोपाळराव मदाने इ. कार्यकर्त्यांनी स्वदेशी व अस्पृश्योद्धार यांचे कार्य कसे केले ते सांगितले. या कार्यक्रमाच्या अध्यक्षपदी प्राचार्य डॉ. मुकुंदराव तांबे होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक म.सा.प. चे अध्यक्ष प्रा. पुरुषोत्तम पाटील यांनी, पाहुण्यांचा परिचय श्री. उमेश शिंदे यांनी व कार्यक्रमाचे व्यवस्थापन व आभार प्रदर्शन म.सा.प. चे कार्यवाह श्री. वसंतराव गवळे यांनी केले.

**वसंतराव गवळे**, कार्यवाह

## ठाणे जिल्हा शाखा

**११ डिसेंबर २००२.** ७६ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष **प्रा. डॉ. सुभाष भेंडे** यांचा मराठी ग्रंथ संग्रहालय, म. सा. प. या संस्थांच्या सहकार्याने सत्कार.

**९ मार्च २००३.** साहित्यिक **कै. वि. वा. जोशी** यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ प्रा. डॉ. मंगला सिन्नरकर यांचे 'प्राचीन मराठी साहित्य संशोधन– दोन कवींच्या संदर्भात. संत नरहरी सोनार व संत चरित्रकार धुंडीसुत माल' या विषयावर व्याख्यान.

**३० मार्च २००३.** शाखेद्वारा ७ वे ठाणे जिल्हा मराठी साहित्य संमेलनाचे आयोजन. अध्यक्ष डॉ. अरुण टिकेकर. ह. मो. मराठे यांची नीलिमा पालवणकरद्वारा मुलाखत. अलीकडे चरित्रप्रधान नाटके का नसतात? सहभाग– चंद्रकांत कुलकर्णी, केदार शिंदे, संतोष पवार, जयंत पवार, सुरेश मगरकर व अशोक पोहेकर, सूत्रसंचालन श्री अशोक साठे, याच वेळी शेवटच्या सत्रात 'पाण्यात दिवे सोडावे' हा गझलांचा कार्यक्रम, सहभाग सदानंद

डबीर, मनोहर रणपिसे, ए. के. शेख व ललिता बांठीया. यावेळी निर्झर (पद्मा देशपांडे), शब्दगंध (ललित) नयना आचार्य, बखर सुभेकल्याण (किरण जोगळेकर) यांच्या पुस्तकाचे प्रकाशनही अध्यक्षांच्या हस्ते झाले.

**पद्माकर शिरवाडकर,** कार्यवाह

## शाखा इस्लामपूर

**१० डिसेंबर, २००२– आचार्य शंकरराव जावडेकर स्मृतिदिन**

'आधुनिक भारत' या ग्रंथाचे लेखक व थोर समाजवादी विचारवंत आचार्य जावडेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. एस. डी. पवार यांचे 'आचार्य जावडेकर : व्यक्ती व कार्य' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक प्राचार्य शरद भोसले यांनी केले आणि आभार प्रा. दशरथ पाटील यांनी मानले.

**१ जानेवारी, २००३ ग्रंथ प्रकाशन समारंभ**

श्री. रघुनाथ मिरगुंडे यांच्या 'भेटीगाठी' या चरित्रात्मक लेखसंग्रह ग्रंथाचे प्रकाशन ॲड बी. एस. पाटील यांच्या शुभहस्ते आणि प्रा. विजय कारेकर पुणे यांच्या प्रमुख उपस्थितीत व प्रा. शामराव पाटील यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाले. डॉ. मधुकर हसमनीस, प्राचार्य शरद भोसले, डॉ. दीपा देशपांडे यांनी या ग्रंथाचे परीक्षण केले.

**१९ जानेवारी, २००३ एकदिवसीय साहित्य संमेलन**

लोकनेते राजारामबापू पाटील स्मृतिदिनानिमित्त डॉ. यशवंत गौतमबुवा पाठक, मनमाड यांच्या अध्यक्षतेखाली एकदिवसीय साहित्य संमेलन संपन्न झाले. उद्‌घाटन डॉ. भीमाशंकर देशपांडे गुलबर्गा यांनी केले. स्वागत व प्रास्ताविक प्रा. शामराव पाटील यांनी केले. पाहुण्यांचा परिचय प्रा. दशरथ पाटील यांनी करून दिला. साहित्यासाठी निर्भय मनाचा ताठ कणा असला पाहिजे, अस्वस्थता ही नव्या सर्जनाची पहाट असते असे मत डॉ. पाठक यांनी व्यक्त केले. दुसऱ्या सत्रात 'संत साहित्य कालबाह्य झाले आहे काय?' या परिसंवादात डॉ. मुकुंद दातार– वारणानगर, डॉ. वि. रा. तोडकर– इस्लामपूर आणि प्रा. डॉ. दीपा देशपांडे

---

## साभार नोंद

१. 'क्ष' हितचिंतक याजकडून संस्थेस २०००/- (दोन हजार) रु. देणगी
२. शताब्दी समारंभासाठी साहित्यप्रेमी भगिनी मंडळातर्फे २५००/- (दोन हजार पाचशे) रु ची देणगी.
३. श्री. म. ना. गोगटे यांनी गो. रा. परांजपे पुरस्कारासाठी योग्य ते व्याज मिळण्यासाठी ७०००/-(सात हजार) रु.ची अधिकची देणगी दिली.
४. श्री. सतीश श्रीपाद कापरे यांच्यातर्फे शताब्दी महोत्सवासाठी १०००/- (एक हजार) रु. ची देणगी.



अनुक्रमणिका

यांनी आपले मनोगत व्यक्त केले. पत्रकार विजय चोरमारे यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन पार पाडले. स्वागताध्यक्ष प्रा. शरद भोसले यांनी सर्वांचे स्वागत केले.

**गौरी देशपांडे व कवी सुरेश भट यांना श्रद्धांजली**

दिवंगत गौरी देशपांडे व कवी सुरेश भट यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. डॉ. मधुकर हसमनीस, प्रा. व्ही. डी. कदम, प्रा. एन. एम. क्षीरसागर, प्राचार्य शरद भोसले, डॉ. दीपा देशपांडे, प्रा. दीपक स्वामी व प्रा. सूरज चौगुले यांनी त्यांच्या साहित्याचा परामर्श घेतला.

**अर्थसंकल्प चर्चासत्र**

राज्याचा २००३-०४ चा अर्थसंकल्प सादर झाल्यानंतर त्याच दिवशी अर्थतज्ज्ञ प्रा. एस. के. कुलकर्णी, डॉ. एन. एम. शिंदे व डॉ. एस. व्ही. देशपांडे, चार्टर्ड अकौंटंट सुनील वैद्य व ॲड. मनीषा रोटे यांनी या चर्चासत्रात सहभागी होऊन अर्थसंकल्पावर आपली मते व्यक्त केली.

**३१ मार्च २००३ : डॉ. विवेक देशपांडे स्मृतिदिन**

'गप्पाष्टक' हा कार्यक्रम सादर करणारे संजय उपाध्ये, मुंबई यांचे डॉ. विवेक देशपांडे स्मृतिदिनानिमित्त आयोजित केलेल्या 'समाजातील बुद्धिवादी वर्ग– शाप की वरदान' या विषयावर व्याख्यान झाले. स्वागत व प्रास्ताविक प्रा. शामराव पाटील यांनी केले. आभार सौ. वृषाली आफळे यांनी मानले.

वरील सर्व कार्यक्रमांना या परिसरात प्रचंड प्रतिसाद लाभला.

**प्रा. दशरथ पाटील**
कार्याध्यक्ष

---

**नवे आजीव सभासद**

१) आपटे स्मिता उदय, पनवेल
२) ताम्हनकर कौस्तुभ दिलीप, ठाणे
३) पोतदार अनुराधा कृष्णकुमार, कळवा
४) आढारी विजयराव, घोडेगाव, जि. पुणे
५) शिंदे गोरखनाथ दगडू, घोडेगाव
६) पाटणकर शुभदा राजेंद्र, पुणे
७) आपटे विनीता हेमंत, पुणे
८) लिमये श्यामकांत दाजी, पुणे
९) गरुड दिलीप मानसिंग, सांगली
१०) तेलंग विजया, गुलबर्गा
११) चाफडकर शंकर, बेळगाव
१२) कुंटे अर्चना आर., पुणे
१३) वैद्य धुंडिराज नारायण, कल्याण
१४) पिंपळे मेधा चंद्रमोहन, भिवंडी
१५) पिंपळे वर्षा नंदकिशोर, भिवंडी
१६) दांडेकर मानसी योगेश, तळेगाव-दाभाडे



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Partrika Quarterly-April-May-June 2003
Registered with the Registrar of Newspapers for India Under N0, 6398/57

बुक पोस्ट

प्रती

प्रेषक : प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद** टिळक रस्ता, पुणे– ४११ ०३०.